# अध्याय ३ रा

## अनुक्रम

**अर्जुनाची सुलभ विवेकाची याचना : मजकडून घोर कर्म कां करवितां? (१-५)—**

याबर अर्जुनानें म्हटलें तें ऐका कीं-देवा, तुम्हीं जें (वाक्य) बोलिलांत तें मी चांगल्या प्रकारें हे लक्ष्मीपति ऐकिलें (१). तेथें कर्म व कर्ता मुळींच उरत नाहीं, असें जर तुमचें मत-अभिप्राय-निश्चित असेल तर मग (२). **घोर युद्धकर्मांत लोटून देतांना तुमच्या मनास संकोच कसा वाटत नाहीं**-मजला हे श्रीहरि घोर युद्धकर्मांत (कर्म करण्यांत घालतांना) लोटून देतांना तुमच्या मनास संकोच कसा वाटत नाहीं बरें! (३). समूळ-अशेष कर्म सोडण्यास सांगतां व मग ज्यांत हिंसा-जीववध होतो असें युद्ध कां बरें मजकडून करविण्याचें करितां? (४). श्रीहृषीकेशा, तुम्हीं हें विचारांत घ्या कीं, तुम्हीं कर्माला बिलकुल महत्त्व देत नाहीं आणि एवढी घोर युद्धासारखी हिंसा मजकडून करवीत आहांत की-(५).

**संदिग्ध बोलून घोटाळा घालतां, तर मग, कसें करावें : मला घोटाळ्यांत कां घालतां? (६-१७)—**

देवा तुम्हीं असें बोलावें जर, तर मग आम्हीं-ज्या आम्हांवर नेणतेंपणच परिणाम करीत असलेलें, त्या आम्हीं काय करावें बरें?-येथें आतां विवेकाचा बाजारच उठला म्हणायचा कीं! विवेक हा (हटाचा) असा नव्हेंच असा होत आहे! (६) अहो, असा जर आपला उपदेश-तर मग भ्रम तो कांहीं दुसरा तिसरा नव्हे! हा भ्रमच एक घोटाळा घालणारा! आमची आत्मबोधाची हौस, आवड, इच्छा इथेंच पुरली; संपली म्हणायची कीं!-(७). वैद्य पथ्यच वारून दूर करीत चालला-मग आपण स्वतःच तें विषच कीं घातल्या-प्रमाणें-तर मग रोगी कसा जगेल तें सांगावें (मजला) कीं!-(८). आंधळ्याला आडवटेला लावावें, अथवा कर्मठासच अमली पदार्थ परिणाम करणारा व्हावा, तसा हा उपदेश चांगलाच कीं आम्हांस मिळाला म्हणायचा (९). मी नेणता असा, मोहानें आकळलेला, म्हणून श्रीकृष्णा, तुम्हांला विवेक विचारला-(१०). तुम्हांस अनुसरलों, त्या तुम्हीं, ऐसें कैसें करावें कीं, एकेक नवें नवें बोलणें (असेंच) कहाणीचें; त्यामुळें उपदेशामध्यें गोंवाच-घोटाळाच-कीं पडत आहे-(११). कायावाचामनेंकरून तुमच्या बोलास-उपदेशास अनुसरावें, आश्चर्याचें करावें, येथें आतां तर जगणें संपलेंच म्हणावयाचें!-(१२). आतां अशा तऱ्हेचा उपदेश-आमचाच आम्हांस घोटाळाच होत आहे! इथें ज्ञानाची इच्छा-(आस) ती काय (न) कसची बरें पुरती होणारी अशी!-(१३). तुमच्याकडून निश्चयात्मक विचार कळण्याची गोष्ट संपली; पण एवढ्यानेंच झालें नाहीं-तर एका विचारावर असलेलें माझें मन-चित्त तें उलटें भ्रांतींत पडलें आहे (मन ढवळलें, हाललें गेलें)-(१४). तसेंच हे श्रीकृष्णा, तुमचें चरित्र कांहींच जाणलें जात नाहीं! जरी का ह्या निमित्तानें माझें चित्तच तुम्हीं तपासून पाहत आहांत!-(१५). अथवा आम्हांस झकवीतच आहांत-जे कां गूढ भाषेनें ध्वनीस तत्त्वच म्हणत आहांत-असें हें खरें पाहिलें असतां जाणवलें जाईना!-(१६).

**मला सोपा असा मऱ्हाटा जी विवेक सांगावा—**

म्हणून देवा, हा भावार्थ आतां नच बोलता मला मऱ्हाटीचा तो, विवेक कसा तो, सांगण्याचें करावें-(१७).

**येथें मी काय करावें तें निश्चित सांगा : (१८-२१)—**

मी अत्यंत जडबुद्धीचा असाही चांगुलपणानें ऐकत आहे!- तसें तुम्हीं ठामपणाचें बोलावें (१८). देवा, रोगास जिंकण्याचें तर औषध (द्यावें-पण) तें अति रुचकर, मधुर असें असावें (१९). सर्व अर्थहेतूनें युक्त असें तत्त्व-उचित तें सांगावें;-ज्यायोगें का माझें चित्त बोधानें बोधलें असें होईल कीं-(२०). **निजनित्य ब्रह्म जें तेंच गुरुपदास आलेलें व आतां मी कां बरें माझ्या आर्त अवस्थेस धन्यता देऊं नये?-मी आपली इच्छा कां तृप्त करून घेऊं नये-तें-?** देवा तुम्हां ऐसा गुरु-निजनित्य ब्रह्म जें तेंच कीं गुरुपदास आलेलें जसें!-आज मी कां बरें माझ्या आर्त अवस्थेस धन्यता देऊं नये? तें-आर्त अवस्था पुरती करून घ्यावीच-तृप्तीची व्हावी! इथें भीड कुणाची व काय कसची ती! अहो, तुम्हीं तर आमुची मायच आतां जिव्हाळ्याचे कीं!-(२१).

**म्हणून गुरुपासून आपले मनोरथ पूर्ण करून कां न घ्यावे? : (२२-३१)—**

अहो! कामधेनूचें दूधदुभतें दैवयोगानें हातीं आलें-हातचें झालें, प्राप्त झालें-येथें आतां (मग) कामना-इच्छा पुरती करून घेण्याची वाट कशास पाहण्याची ती! उणीवेची इच्छा तृप्त करून घेण्याचें तें तसें कां बरें न व्हावें? (२२). सर्व इच्छा, (कामना) तृप्त करणारा मणी जर हातीं आला-तर गणपती देवच जसा इच्छेचें पुरतें करणारा असा; येथें (मग) आतां वाञ्छा, इच्छा, कामना तृप्त व्हावीच-करून घ्यावीच-तेथें संकट तें कसचें! आपल्यास आवडतें असें, आवडेल तसें तें पुरतें करून घ्यावें कीं!-(२३). अहो, अमृताचा सिंधु-हातीं आला आतां तहानेनें कां बरें फुटावें, तडपावें तें? येथें जर नच वाञ्छापूर्ती केली तर कामना पुरती व्हावी म्हणून केलेले सायास (-जे दीर्घ प्रयत्न-) ते कशास बरें केलेले? (२४). (अनेक) जन्मजन्मांतरीं (श्रीकमळापति) श्रीलक्ष्मीपतीची उपासना-(सेवा) केलेली ती. आतां तो देवच एक लक्ष्मीकांत आज दैवयोगें (माझे) हातींचा झाला (आहेस) (जरी) कीं अहो-(२५). तर मग मी तुम्हांस आपल्या स्वइच्छेनें कां नच मागावें बरें? तुम्हीं माझे आंगचे व्हावेत, (असा मी-नच मागावें तें) अहो देवा! (मानसाचे)-माझ्या मनानें-तर आज भाग्याचा दिवस पाहिला-होत आहे-आज माझें भाग्य उदयास आलें आहे-(२६). अहो देवा, सकल इच्छांचें साफल्य आपणच कीं आज येथचें झाल्यानें, माझें जिणें-जीवित-सफळ होऊन तें यशवंत होवो अशा भाग्याचें झालें आहे. अहो, माझे मनोरथ सिद्धीला गेले-जात आहेत कीं!-(२७). अहो, जी जी-आत्यंतिक कल्याणाचें निधान-परममंगलधामा-सकळ देवांच्याहि उत्तम देवा-तुम्हीं आज स्वाधीनच झालेले आहांत म्हणून कीं-(२८). अहो, येथें काळ वेळ कसची! त्वरिततांच एक परिणामकारी! अहो! मातेनें अपत्य स्तनास लावणें तेथें स्तनपानाला वेळ अवेळ अशी केव्हांच नाहीं ज्याप्रमाणें, तसें-अहो, देवा! तुम्हांस आवडीचें असें माझें साफल्य जीविताचें तें विचारीत आहे-(२९). अहो, कृपानिधी! मी आपल्यालाच कीं-परलोकमार्गाला साह्यकर असें कांहीं पुसिजत, (जीविताचें) विचारीत आहे. अहो, करुणेचे सागर त्या-तुम्हां-अहो!-(३०). परत्रहित कशांत आहे, तिथें आचरण तें उचित योग्यच तें कसें, असें तें निश्चयेंकरून सांगा-[असें पार्थ म्हणत आहे-] (३१).

**ज्ञाननिष्ठा व कर्मनिष्ठा :**

हे अर्जुनाचे बोल ऐकून देव विस्मित, चकित झाले, व म्हणूं लागले कीं, अर्जुना, येथें तुला सांगितला तोच हेतु-गर्भितार्थ खरा जाण (३२). जें कांहीं बुद्धियोगासंबंधीं सांगतां, सांगतां सांख्यज्ञान, वैराग्ययोग संस्था ती तेथें सांगतां फलद्रूपता ती आपलेपणा वागविणारी ती येथें स्वतः आपणच व्हावें (३३). तो आपलेपणाचा उद्देश, (हेतु जाणण्यासंबंधीं) नेणतेंपणच एक तेथें वागवीत आहेस-म्हणून व्यर्थच शिणत आहेस, (शिणला आहेस), तरी आतां हीं दोन्हीं मतें-तत्त्वें मी जीं (उक्त-) बोलिलों (असें जाण). येथें बोलाचें होणें तेंच

मी कीं आपण स्वतः (होय, हेंच जाण)-(३४). अनादि असे हे ज्ञानमार्ग व कर्ममार्ग आहेत. अनादिसिद्ध अशा ह्या दोन्ही निष्ठा मजपासूनच कीं प्रगट झालेल्या-(३५). ह्या दोहोंतला भेद-ज्ञानयोग म्हणावा, तो सांख्यांनीं अनुष्ठावा, तेथें सहज ओळखीवरच (बरोबरच कीं) तद्रूपता पावली होते-(३६). एक कर्मयोग समज; जिथें साधकजन हे निपुणपणाचे होऊन वेळेवरच कीं निर्वाण पावतात-(३७). हे मार्ग तर दोन आहेत; पण ते शेवटीं (दोघांना) एकमेकां एकच गति देणारे आहेत. तेथें जीवितसाफल्यच एक पदरांत पडणारें-जसें, भोजन साध्यसिद्ध असें तें झाल्यानें, भोजन झाल्यावरच कीं-तृप्तीच एक भेटणारी-(३८). ज्ञानयोग व कर्मयोग एकाच ठिकाणीं नेतात (३९). त्याप्रमाणें हीं दोन्हीं मतें एक कारणच सुचवितात, एका कारणासंबंधीं सूचना देतात; पण तेथें अहो, देह उपास्ती योग्यतेच्या आधीन असणारी होय. दोन्हीं मार्गांचें साध्य एकच आहे, पण दोहोंपैकीं कोणत्या मार्गाची उपासना किंवा अभ्यास करावयाचा हें ज्याच्या त्याच्या योग्यतेवर अवलंबून आहे (४०).

पक्षी जसा उड्डाणासरिसा फळास झोंबतो तसा-काय केलें असतां तो नर वेगास (येईल) येतो-तें म्हणजे तो हळुहळू फांदीफांदीनें जाऊन कांहीं एका वेळानें, मार्गाच्या बळावरच कीं निश्चितपणें आपल्या ध्येयास पावतो (४१). तसें जाण कीं, या विहंगम मार्गानें ज्ञानास अधिष्ठून, सांख्यज्ञानी वैराग्यवंत ते मोक्षातें ताबडतोब आकळून, घेऊन असतात (४२). ज्ञानमार्गाला विहंगम मार्ग व कर्ममार्गाला पिपीलीका मार्ग म्हणतात. ज्ञानी पक्ष्यासारखें उड्डाण करतो, व पटकन् लक्ष्याला झोंबतो. म्हणून त्याच्या मार्गाला विहंगम मार्ग म्हणतात. कर्माचा अधिकारी पुरुष (हळुहळू, पिपीलिका म्हणजे) मुंगीच्या पाउलानें चालतो म्हणून त्याचा तो पिपीलिका मार्ग होय. सांख्यज्ञानीसुद्धां सद्यः लवकरच सकल मोक्षपद गांठतो. कर्ममार्गी विहित कर्माचरणानें मोक्ष पूर्णतः पावतोच, पण दीर्घकालानें !-(४३). दुसरे योगी कर्माच्या आधारानें आपल्या विहित (निज, नित्य) कर्म-आचारानें कांहीं काळानें पूर्णता पावणारे होतात-(४४).

## कर्मआरंभास भर देऊन फल-इच्छा न ठेवतां कर्म करणें तेथें कर्मारंभाशिवाय निष्कर्म होतां येत नाहीं : (४५-५२)—

विहित कर्म ज्ञानियाप्रमाणें न करतांच कोणी मलाहि शीघ्र मोक्षलाभ होईल असें म्हणेल, तर मात्र त्या कर्महीनाला निश्चयानें तो मोक्ष मिळणार नाहीं (४५). वर्णाश्रम धर्माप्रमाणें अवश्य असें प्राप्तकर्म तें सांडिजे व एवढ्यावरच नैष्कर्म्य-(कर्म न करणारा निष्कर्मी) होईजे, असें हे अर्जुना, व्यर्थच कीं मूर्खपणाचें बोलणें ना! (४६). भवसागर तरून जावा असें वाटतें तर तेथें (नामस्मरणरूपी) नावेस त्यजणें नच घडेल-तेथें नावेस त्यजावें तें कां?-(४७). अथवा इच्छातृप्ति व्हावी असें वाटत असेल; तर तसा स्वयंपाक कां बरें नच (व्हावा)-करावा? तसेंच (जर) स्वयंपाक सिद्ध (आहे,) तो तरी कां बरें नच सेवन करावा?-(४८).

### विहित कर्माचरण :

जोंपर्यंत निरिच्छपणा नाहीं, तोंपर्यंत कर्म करणें आहेच-(तेथें कर्म व्यापारणें असणारच) तें मग संतुष्टतेच्या परिणामानें सहजच कीं बंद पडतें-खुंटते कीं-(४९). हे पार्था! आणि म्हणून ऐक कीं, ज्यांस नैष्कर्म्यपदाची इच्छा आहे, त्यानें उचित कर्म केलेंच पाहिजे-उचित कर्म त्यजूं नये-(५०). (आपल्याच इच्छेनें-) कर्माचा स्वीकार व त्याग आपल्याच इच्छेनें होतो का इच्छेवर अवलंबून नसतो-(असत नाहीं). तेथें त्यजिलेलें कर्म सांडतें, सोडलें जातें, बाजूस होतें असें नाहीं. कर्मत्याग केव्हांहि होत नसून, तें त्यजिलेलें कर्म तें आपल्या पुरतेंपणास येण्याची वाट पाहत असलेलें असतेंच कीं !-(५१). त्यजिलेलें कर्म तें सांडतें, नाहींसें होतें-अहो, असें म्हणजे तें वायांच बोलणें! उलगडा पाहिजे असल्यास तसें तें देखून-करून पाहावें. जेथें का त्यजिलेलें कर्म तें त्यजिलें होतें सांडतें, बाजूस होतें असें नाहीं-असें पूर्ण निःसंशय-पूर्ण असें खात्रीनें जाण !-(५२).

**देहधारी जीवाला कर्मावांचून एक क्षणही राहतां येत नाहीं : (५३-६३)—**

जोंपर्यंत प्रकृतीचें अधिष्ठान तोंपर्यंत सांडणें, मांडणें, घेणें, त्यजणें हें अज्ञान होय. जें कांहीं चेष्टणारें, व्यापारणारें, हालणारें, चालणारें, येणारें, तें गुणांच्या आधीनतेचें असें आपोआपच असतें कीं-(५३). अहो! आपलें तें-चारी वर्णांचें-कर्तव्यकर्म-धर्माचे आश्रयानें नेमलेलें कर्म-तें सारें जरी सोडलें, टाकलें-तरी काय अहो, हीं इंद्रियें गप्प बसणारीं होतील-असतील?-(५४). सांग बरें की-कानाचें ऐकणें बंद होत असतें?-कानानें आपला गुण ऐकण्याचा तो टाकून दिला होतो?-अथवा नेत्राचें देखणें तें नाहींसें झालें म्हणावें?-डोळ्यांमधील तेज काय नाहींसें होतें? तें तेथें असतेंच असतें-नासारंध्र बुजलें व त्यानें सुगंध घेण्याचें टाकलें तें-असें होतें काय? तें तर चालू असतेंच-(५५). अहो! प्राणाची, अपानाची (वेग) गती खुंटली आहे काय? मती ही संकल्पविकल्पहीन झाली आहे काय? तसेंच ह्या जीवदशेच्या ऊर्मी ज्या क्षुधा, तृषा, जरा वगैरे ज्या-त्या काय बंद पडल्या आहेत? त्या परिणाम करणाऱ्या आहेतच आहेत-होतच आहेत ना?-(५६).

अहो, हें झोंपणें, स्वप्न पडणें का जागृत होणें, हें काय ठरलें-थांबलें? चरण काय चालणें ते विसरले आहेत? असें हें असो-पण जन्म-मृत्यु हे काय निमाले म्हणावेत? उपजणें, मरणें, (निमणें) न चुकतां नित्य असें होतच असतें-(५७). असें हें सर्व कांहीं बंद पडले(लें) नाहीं; तर मग तेथें सांडिलें-सवरिलें-तें काय म्हणावें? आणि म्हणून प्रकृतिमंतांना-देहधाऱ्यांना-केव्हांहि कर्मत्याग नाहींच नाहीं हें समज!-(५८). प्रकृतीच्या परतंत्रते-मुळेंच कीं (पराधीनपणामुळें)-प्रकृतीच्या गुणांमुळेंच-कर्म हें निपजतें, उत्पन्न होतें. तेथें दुसऱ्यांची मोकली अंतःकरणें तीं व्यर्थच कीं वाहणें होत आहे कीं!-कर्म हें प्रकृतीच्या गुणांमुळें होत असल्यामुळें पराधीन आहे; आणि म्हणून मी हें कर्म करीन किंवा टाकीन असें अंतःकरणानें-मनानें मानणें व्यर्थ होय!-(५९). जाण कीं, रथावर चढावें व मग निश्चळ बसणें व्हावें-बसावें; तरी मग, परतंत्रतेमुळें चळणें होऊन हिंडावें होत असतेंच कीं-(६०). वायुवशतेनें उचलिलेलें शुष्क पत्र-झाडाचें वाळलेलें पान-चळतें; तें (स्वतः हालचाल न करतां) वर आकाशात फेंकलें जातें-(६१) तसेंच प्रकृतीच्या आधारामुळें, कर्मेंद्रियांच्या विकारामुळें नैष्कर्म्य स्थितीला पोहोंचलेला पुरुषहि निरंतरपणें व्यापारतो, कर्म करतो, हालतो, चालतो, उठतो, बसतो-(६२). जंव प्रकृतीचा संग आहे तंव कर्माचा त्याग घडणेंच शक्य नाहीं व तसा तो त्याग करूं म्हणणाऱ्याचा नुसताच एक आग्रह उरतो म्हणावा कीं-(६३).

**निष्कर्म न होतां केवळ इंद्रियनिरोध तो दांभिक आचार : (६४-८७)—**

जे कर्मेंद्रियांची प्रवृत्ति ती निरोधून उचित कर्म सांडतात व यावर मगच नैष्कर्म्य होऊं पाहतात-(६४). त्यांना कर्मत्याग घडत नाहीं, जें का कर्तव्य करणें मनामध्यें उरून असतें म्हणून; व अशा त्या कर्तव्याचें न करण्यावरच जे (नैष्कर्म्यतेनें) नटूं थटूं पाहतात ते "दरिद्रच" [(बुद्धि)-दारिद्र्यच] म्हणावें कीं-(६५). असे ते पार्था-सर्वथा विषयासक्त जाणावेत, यासंबंधीं कांहींहि शंका का भ्रांति ती नाहीं!-(६६) आतां लक्ष देऊन ऐकत असावेंस सहज प्रसंगानें निरिच्छपणाचें लक्षण-नैराश्याचें चिन्ह-हें तुजला मी सांगण्याचें करीत आहे-(६७).

**निष्काम कर्मच स्वधर्म होय. स्वधर्म तोच नित्ययज्ञ. फलेच्छारहित कर्म करण्यानें निष्कर्म होतां येतें : (६८-७६)—**

जो अंतःकरणानें दृढ, निश्चल, परमात्मरूपी गूढ, बाह्यात्कारी लोकाचाराप्रमाणें वागणारा, लौकिकाचा असा-(६८). तो इंद्रियांना आज्ञा नच करणारा, विषयांचें भय न धरणारा-भागाला आलेलीं उचित आणि अवसरोचित जीं जीं कर्में तीं नच टाकणारा-(६९). हात, पाय इत्यादि कर्मेंद्रियांनीं जो कर्मामध्यें राहाटत

असतां इंद्रियें स्वाधीन ठेवतो-इंद्रियांचें नियमन करतो; तेथच्या आवेशामुळें सुखदुःखांत गुंतत नाहीं-(७०). तो वासनेनें बद्ध होत नाहीं; मोहाच्या घाणीनें मळत नाहीं, लिंपत नाहीं; जसें जळामध्यें कमळाचें पान भिजत नाहीं-(७१). तसा संसारांत-संसर्गामध्यें-असतो; सकळांच्या सारखा दिसतो; जसें का तोय=पाण्यामुळें भानुबिंब आभासतें-जसें दिसतें तसें-(७२). तसें सामान्य (सर्वसाधारण)पणें पाहिलें तर तो साधारणच एक असा दिसतो. एरव्हीं (निश्चितार्थ-)निश्चयानें निर्धारावर जाणणें होत नाहीं-जे का त्याची सोय-आत्मस्थिती का खोली ती कशी ती-(७३). अशा चिन्हांनीं युक्त, चिन्हित पाहिलास तर तोच मुक्त म्हणावा-तो आशापाशरहित असा तूं ओळख-(७४). अर्जुना! तोच योगी विशेष वर्णिला जाणारा जगामध्यें, जो का विशेष प्रकारें स्तविला जातो, आणि म्हणून यालागीं तूं असा योगी (मुक्त) हो, असें तुला माझें सांगणें आहे-(७५). तूं आपलें मानस नियमाचें कर, अंतरीं निश्चल हो; व मग कर्मेंद्रियें तीं सुखानेंच व्यापारीं-वर्तत-वागत असोत-(७६).

## नित्यकर्मानेंच परंपरेनें मोक्ष मिळतो : (७७-८०)—

म्हणून नैष्कर्म्य-कर्मरहित-असावें, व्हावें; तरी तसें तें येथें मुळींच संभवाचें होणारें नव्हें व असें जर, तर मग निषिद्ध जें तेंच कीं विचारांत घे कसें बरें आचरावें तें!-(७७). म्हणून जें जें उचित-प्रसंगेंकरूनच प्राप्त होणारें, झालेलें-तें कर्म, तुंवा हेतु, बीज नच ठेवून आचरण्याचें करावें-(७८). पार्था! आणिक कांहींएक तूं जाणत नाहींस-कौतुक आहे तें-जें का असें हें निष्काम कर्म-कर्माच्या बंधापासून सहज सोडवितें!-(७९). असें पाहा कीं, पूर्वींच्या अनुक्रमाच्या आधारानें स्वतःचा धर्म-कर्तव्य-जो आचरील, त्या आचरणानें तो मोक्ष पावतोच निश्चित-हे निश्चित पावेलच-(८०).

## ब्रह्मदेवाचा सृष्टीच्या आरंभीं प्रजेस स्वधर्मोपदेश-नित्यकर्म न केल्यानें जीवाला बंध होतो-नित्यकर्म केल्यानें बंध होत नाहीं : (८१-८४)—

अहो बाप्पा! स्वधर्म जो, तोच नित्य यज्ञ जाणावा. निजधर्माप्रमाणें, स्ववर्णाप्रमाणें वर्तत असतां दोषास शिरकाव नाहीं-(८१). हा निजधर्म, निज, नित्य ब्रह्म-जेव्हां का सांडला होतो, तेव्हांच मुळीं कुकर्म म्हणजे -स्वधर्माला सोडून केलेलें परधर्माचें आचरण-तेथें रति घडते न घडते तोंच कीं-सांसारिक हें बंधन पडणारें होतें!-(८२). म्हणून स्वधर्मानुष्ठान, स्वधर्मास नित्ययज्ञास ते हेंच अखंड असे यज्ञ-याजन जो करीत राहतो, त्याला कधींहि बंधन पडत नाहीं-(८३). कर्मानें हा लोक बांधला आहे, म्हणून जो परतंत्रास (अविद्येस) भुलला तो नित्ययज्ञास-चुकला-मुकला- होतो-(८४).

## जें कांहीं नित्यकर्माचें मोक्ष मिळणें परंपरेनें तें तेथें ब्रह्मदेवाची गोष्ट-कथा ती : (८५-९७)—

आतां यासंबंधीं पार्था, तुजला एक कथा मी सांगेन. जें कांहीं ही सर्व सृष्टि आदिकरून संस्था ब्रह्मदेवानें केली आहे त्याबाबत-(८५). समस्त भूतें हीं नित्ययज्ञाबरोबरच उत्पन्न केलेलीं. धर्मासहित भूतें जन्मलीं. प्राणी व त्यांचे धर्म बरोबरच उत्पन्न केले. पण तो स्वधर्मयज्ञ सूक्ष्म असा, गूढ असा असल्यानें तीं भूतें त्या यज्ञासंबंधीं नेणतेपणच वागवून आहेत-(८६). तेव्हां प्रजांनीं ब्रह्मदेवास विनविलें कीं देवा! येथें आम्हांस आश्रय-(आधार, शरण्य)-गृह तें कुठचें! यावर ब्रह्मदेव भूतांप्रति म्हणतात-(८७). तुम्हांस विहित-कर्मवशेंकरून स्वधर्मयज्ञ निश्चित केला आहे; त्यास उपासावें; म्हणजे तुमच्या सर्व इच्छा पुरतील-(८८). तुम्हीं व्रतनियम करूं नयेत, शरीरास दंडूं नये, कुठेंहि दुसरीकडे दूरच्या तीर्थास जाऊं नये-(८९). योग, साधनें, आराधनें, मंत्र-तंत्र-यंत्र विधानें नकोत-(९०). दुसऱ्या अनेक देवतांना-देवतांतरा-भजूं नये. तुम्ही स्वधर्म-रूपी यज्ञ यजावा, भजावा, पूजावा, सहजीं सहजच कीं!-(९१).

हेतु नच ठेवून, चित्त हें निर्हेतुक करून त्या स्वधर्मरूप यज्ञास आचरावें, अनुष्ठावें-जशी का पतिव्रताच एक पतीस अनुसरून वरते जशी !-(९२). तसा स्वधर्मरूपी यज्ञच कीं, हाच एक तुम्हांस भजण्यास, सेवण्यास, योग्य जाणा, असें सत्यलोकीचे स्वामी ब्रह्मदेव बोलिले-बोलते झाले-(९३). पाहा कीं-तुम्हीं स्वधर्मास भजाल तर हा स्वधर्मच कामधेनूप्रमाणें इच्छित मनोरथ पूर्ण करणारा होईल. एऱ्हवीं हाच स्वधर्म कीं जर नच आचराल का तिकडे दुर्लक्ष कराल तर मदान्कदा तुम्हांस नाहील कीं !-(९४). अशा तऱ्हेनें स्वधर्म आचरण्यानें ज्यायोगें समस्त देवतांना परिपोष होईल; व असें झाल्यानें जें तुम्हीं इच्छाल तें (तुमचें इच्छित) देव तुम्हांस देतील-(९५). आपल्या धर्मानें पूजणें भजणें केल्यानें, तुमच्या सर्व सुखाचा जीवनक्रम देव चालवितील. निःसंशय ते तुमचा जीवनक्रम सुखाचा करतील, अप्राप्य आत्मवस्तूची प्राप्ति, तो योग, व प्राप्तीचें संरक्षण ते सुखावह करतील-(९६). देवांना भजाल तर देव तुम्हांस संतुष्ट करतील अशी परस्पर प्रीति घेऊन-(९७).

## नित्यकर्मानुष्ठानानें देव प्रसन्न होऊन जीवाला भोगसमृद्धि देतात : (९८-१०२)—

जें कांहीं करूं म्हणाल तें आपोआपच सिद्धीस जाईल-मानसींचें-इच्छितहि पुरतें होईल-(९८). वाचासिद्धि पावाल, आज्ञापक होआल, म्हणिये तुम्हां मागतील, (महाऋद्धि-स्वधर्मनिष्ठ पुरुषाच्या अंगीं कोणतें सामर्थ्य येतें तें-स्वधर्मरूप यज्ञ करा;) म्हणजे तोंडानें बोलाल तें होईल, स्वामित्व सत्तासुख मिळेल व मोठाल्या रिद्धि तुमची सेवा करतील-(९९). त्याप्रमाणें ऋतूंचा राजा वसंत त्याच्या येण्यानें वनमाधवी लावण्यभारानें प्रगट होते तसी का-(१००). याप्रमाणें सर्व सुखांसहित, मूर्तिमंत दैवच तुमचें देखा, तुम्हांस सदैवतेचें असें होऊन येईल-(१०१). तुम्हीं सुखी, इच्छा पूर्ण झालेले होआल; जर का स्वधर्मामध्येंच कीं रत (अनुरक्त), तत्पर, संतुष्ट होऊन वर्तत राहाल तर कीं-(१०२).

## संपत्तीचा विनियोग स्वधर्माकडे न करील त्याची हानी होईल : (१०३-११०)—

सकल संपदा सहजसाध्य तेथें विषयाच्या स्वादास लुब्ध होऊन इंद्रियमदास अनुसरेल जो-(१०३). यज्ञानें समृद्ध झालेल्या देवांनीं जी ही संपत्ति पुरेपूर दिली आहे-(यज्ञपुरुष भोक्ता जो शरीरधारी जो तेथें आत्म्यानेंच हें शरीर धारण केलें आहे असे जे आत्मरूप पुरुष संबंधीची संपत्ति ती) त्या स्वधर्म संपत्तीनें जो यज्ञेश्वराचें ठायीं भजेल नच-(१०४). अग्निमुखीं हवन, देवतापूजन, प्राप्तवेळेस ब्राह्मणासारखें भोजन नच करील जो-(१०५). गुरुभक्तिविन्मुख होईल जो, अतिथीचा आदर न करील जो, आपल्या ज्ञातीस संतोष नच देईल जो-(१०६). जो केवळ भोगासक्त होईल, स्वधर्मक्रियारहित असा होईल, संपत्तीनें माजलेला स्वच्छंदी जो होईल-(असा आपल्या धर्मामधील जो कांहीं क्रियायोग तो नच आचरील, आथिलेपणानें म्हणजे संपत्ति-मदानें गर्विष्ठ होऊन व फक्त विषयभोगासक्तीमध्येंच कीं केवळ जो आसक्त होऊन आहे-(१०७) त्यास मग थोर असा अपाय आहे-जें का, तेथें दुःखच एक, का अनर्थच एक; कारण काय, तर जें कांहीं सध्यां हातीं आहे तें सर्व कांहीं नाहींसें होईल, जाईल-(१०८). गतायु शरीराचे ठिकाणीं चैतन्याचें वास्तव्य करणें नाहीं; निदैवी जो त्याचे घरीं लक्ष्मी कदाचितच वास्तव्य करणारी होते-(१०९). स्वधर्म लोपला कीं, सुखाचा आश्रय मोडून जाऊन दुःखच एक पुढें होतें. दिव्याबरोबर प्रकाश नाहींसा होतो-(११०).

तशी जेथ निजवृत्ति-(नित्य ब्रह्मवृत्ति-जेथें) हरवते, (सोडते) तेथें स्वतंत्रतेची वस्ती-कदाचित होणारी होते-वस्ती घडतच नाहीं; आणिकहि पुढें कांहीं सांगतों, असें ब्रह्मदेव म्हणत आहे-(१११). याकरितां समजून असा कीं, जो आपला स्वधर्म सांडील, सोडील, त्यास काल दंडण करील; व चोरच कीं एक असें त्यास म्हणून त्याचें सर्वस्व हरण करील-(११२). सकल दोष भोंवून (भोंवतीं राहून) त्यास वेढून घेतील-जशीं भुतें रात्रीं स्मशानास वेढून असतात-(११३). त्याप्रमाणें त्रिभुवनींचीं दुःखें, अनेकविधतेचीं पातकें-तसेंच दैन्यजात (सर्व प्रकारचीं दुःखें-दैन्य) तिथेंच कीं वसणारें होतें-(११४). अहो प्राणिगणहो ! त्या उन्मत्त झालेल्यांचें

असें होतें व मग बाप्पा रडूं कोसळलें तरीहि तें दुःख सर्वथा–कल्पांतींहि–सुटत नाहीं–(११५). म्हणून निजवृत्ति सांडूं नये, इंद्रियें बरळूं देऊं नयेत, असें ब्रह्मदेव प्रजांना (स्वतःचा धर्म पाळावा तोच संरक्षण होय) शिकवीत आहे–(११६). जलचरांना पाण्यानें–(जलानें–) सोडलें, जलचरांचें जल हरवलें तर तत्क्षणींच कीं मरणच एक मांडलें होतें, आकळतें, हें जसें; त्याप्रमाणें जीवितरक्षणार्थ स्वधर्म विसंबावा नच!–(११७).

### मनुष्यानें विहित कर्माचें आचरण करावें : (११८)—

असें आहे म्हणून तुम्हीं समस्तांनीं आपआपल्या उचित कर्मामध्यें पुढतपुढतीं–पुन्हां पुन्हां–रत (अनुरक्त, तत्पर, संतुष्ट) होऊन असावें, असें प्रजातें चतुरानन म्हणत आहे–(११८).

### जीवानें विहितकर्म निर्हेतुक बुद्धीनें केलें असतां पापनिवृत्ति होते : संपत्ती स्वधर्मांत खर्चावी (११९–१२६)—

–(जाण), पाहा कीं (विहित) शास्त्रानें सांगितलेलें कर्माचरण–(क्रियाविधि, निर्हेतुक–निरिच्छ बुद्धीनें) जो आपल्याजवळ असलेल्या धनधान्यादि समृद्धीनें यथाशक्ति विनियोगाचें, उपयोगाचें करतो, (खर्च करतो) –(११९). गुरु गोत्र पूजतो, अग्निपूजा करतो (अवसरीं)–यथाकाळीं द्विजांना भजतो, श्राद्धपक्षादि प्रसंगें–पितरांच्या उद्देशानें–द्विजांचें यजन याजन करतो–(१२०). उचित अशा ह्या यज्ञक्रिया (यज्ञानें यज्ञ अग्नींत हवन) केल्यावर मग जें जें कांहीं हुतशेष (हवनद्रव्यांतील अवशेष) उरेल–(१२१). –तें आपल्या घरीं सुखानें कुटुंबासहित जेवतो; व असें केल्यानें तेथें तर भाग्यच एक पदरांत पडून (भोग्य) (कल्मष) पाप तें नाहींसें होतें. स्वधर्माचरणानें पंचमहायज्ञ करून जें शेष उरेल तें सेविल्यानें सकळ पातकांचा नाश होतो–(१२२). तो यज्ञाचें अवशिष्ट उपभोगणारा–सेवन करणारा–म्हणून त्याजपासून अघ, पाप, दुःख पळून जातें. ज्याप्रमाणें अमृतसिद्धीनें महारोग सांडला होतो (१२३). तत्त्वनिष्ठ, ब्रह्मनिष्ठ जसा भ्रांतींत मुळींच सांपडत नाहीं, तसा तो यज्ञावशेष भोगणारा दोषांनीं आकळला जात नाहीं–(सांपडला होत नाहीं–आकर्षिला जात नाहीं)–(१२४). म्हणून स्वधर्मानें जें अर्जे म्हणजे मिळविलें जातें त्याचा स्वधर्मानेंच विनियोग करावा, व मग जें कांहीं उरेल तें संतोषानें,समत्वानें उपभोगावें–(१२५). अशा या यज्ञावशेष भोजनाशिवाय अन्यथा दुसऱ्या कशाहि तऱ्हेनें राहाटण्याचें करूं नये, अशी ही आद्य कथा श्रीमुरारी सांगत आहेत–(१२६).

### देहात्मवादी पातकी होत : (१२७–१४२)—

जे आपणां स्वतःस देहच एक मानतात व विषयांना सर्वथैव भोग्य म्हणतात; याशिवाय जें दुसरें कांहींहि आठवीत–स्मरत नाहींत–(१२७). हें यज्ञोपकरण सर्व द्रव्य यज्ञार्थ मिळालेली सामग्री–साहित्य आहे असें न समजतां, भ्रांत अहंबुद्धि पुरुष अहंकारानें देहाशीं तादात्म्य पावून विषयभोग इच्छितात–(१२८). इंद्रियांच्या रुचीसारखें–इंद्रियांच्या रुचीस आवडणारीं चांगलीं उत्तमोत्तम पक्वानें करतात, असे ते पापिये पापच सेवन करतात; ते पापी पातक सेवितात–(१२९). हें संपत्तिजात आघवें, हें अवघें सर्व, सर्व वस्तु जीवनोपयोगी असें, सुखावह, तें हवनद्रव्य–होमद्रव्य–तें स्वधर्मरूप होमाचें समजावें, मानावें व मग स्वधर्मरूपी यज्ञानेंच आदिपुरुषीं सकळ विश्वाचा भोक्ता,–भर्ता–त्याचें ठायीं अर्पण करावें–(१३०). आदिपुरुषाचे ठायीं स्वधर्मरूपी यज्ञानें भोग अर्पावेत. ते न करितां मूर्ख ते तर आपणां स्वतःकरितां अनेक पाक निपजवितात कीं!–(१३१).

#### अन्नाची महती – यज्ञचक्र :

जिहीं यज्ञ सिद्धि जाये–ज्या अन्नादिकांनीं यज्ञ पूर्ण होतो–परेशा तोषु होये–परमेश्वर संतोषित होतो, आणि म्हणून असें तें देहपोषक साधारण अन्न नव्हें कीं–(१३२). हें कांहीं साधारण समजूं नये; त्या अन्नाला

सामान्य समजूं नये. कारण तें अन्न ब्रह्मरूप जाण. तें प्रत्यक्ष ब्रह्मरूपच होय. हें जीवनहेतु म्हणजे हेंच जगांतील सर्व प्राण्यांस जगण्यास कारण कीं-(१३३). अन्नामुळेंच समस्त भूतें वाढ पावतात, पोसिलीं होतात व मग पर्जन्य अन्नास सर्व ठिकाणीं उत्पन्न करतो-(१३४). त्या पर्जन्याची उत्पत्ति यज्ञापासून (विष्णु, सूर्य) होते. यज्ञास कर्म प्रगट करतें. कर्माला मूळ कारण वेदविधीप्रमाणें कर्में होतात म्हणून आदिब्रह्म वेदच रूप कारण जाण-(१३५). (पर्जन्यजन्म यज्ञानें-यज्ञास कर्म प्रगट करतें-कर्मास वेदरूप आदिब्रह्म तें)-व यावर मग वेदास परात्पर, अविनाशी ब्रह्म तें अक्षर प्रसवतें; आणि म्हणून या कारणास्तव हें चराचर ब्रह्मबद्ध असें ब्रह्माधीन व ब्रह्मापासून झालेलें आहे-(१३६). कर्माचा ठाव तेथें यज्ञ होतोच का व्हावाच, यज्ञामध्यें श्रुतीचें वास्तव्य अखंड आहे-हे सुभद्रापति, ऐक कीं-कर्ममूर्तिरूपी जो यज्ञ त्यांत अखंड श्रुतीचा अधिवास आहे-(१३७). स्वधर्मरूप यज्ञास-अध्वरा लागोनियां-अशी ही आदि परंपरा-मालिका जगदुत्पत्तीपासूनच चालू क्रम तुजला हे धनुर्धरा, थोडक्यात-संक्षेपतः-सांगितली-(१३८). या कारणास्तव उचित-योग्य-असा हा सकळ स्वधर्मरूप यज्ञ-क्रतु-जो इंद्रियांच्या सेवेंतच ज्याच्या आयुष्याचा नाश झाला असा मत्त-मदयुक्त, मस्त, उन्मत्त-ह्या लोकीं अनुष्ठानाचा करीत नाहीं, भक्तीचा करीत नाहीं-(१३९). तो पातकाच्या राशीच, ह्या भूमीस भार जाण. कारण काय तर इंद्रियांनीं कुकर्म करून-वाईट कर्मानें-त्याच्या आयुष्याचा नाश झाला; इंद्रियांच्या सर्वथैव उपयोगाचा झाला-(१४०).

### जनकादि निष्काम कर्मयोगी :

इंद्रियांचे लळे पुरविणाऱ्या माणसाचें जीवित पूर्ण व्यर्थ ठरतें; लाभाचें होत नाहीं. जसें अभ्रपटळ। अकाळीचे-(१४१). अथवा शेळीच्या गळ्याचे स्तन जे निरर्थक, तसें त्याचें जियालेंपण जाण-समज, देख-ज्यास आपल्या धर्माचें अनुष्ठान घडेना जें का-(१४२).

### विहितकर्माचा कंटाळा करतात ते मूर्ख : (१४३-१४५)—

करितां हे पांडवा! ऐक कीं, हा स्वधर्म कवणेंहि-कोणीहि नच सोडावा-सांडावा, त्यजावा, वगळावा. हाच एक कीं सर्वभाव, ते विद्वान होऊन-विद्वत्तेनें-निष्ठेनें भजावाच!-(१४३). असें पाहा कीं, शरीर जरी झालें तरी मग तेथें ओघाओघानेंच कर्तव्य आलें कीं! असें आहे तेथें, मग आपलें आपणांस योग्य असें जें-उचित तें कां बरें टाकावें-त्यजावें तें?-(१४४). ऐक कीं, हे सव्यसाची अर्जुना! देहाची मूर्ती प्राप्त होऊन जे कर्मासंबंधीं खंती करतात ते अडाणी गावढळ होत-(१४५).

### स्वधर्मानें आत्मज्ञान प्राप्त होतें-कर्मबंध होत नाहीं-व कर्तव्यही उरत नाहीं : (१४६-१५१)—

देहाच्या स्वाभाविक सुखदुःखादि धर्मानें असताहि (असतेनि) येथें तोच एक कर्मानें लिंपला होत नाहीं जो का आत्मस्वरूपांत आपणच अखंड रमतो-(१४६). जे का तो आत्मबोधानें-ब्रह्मबोधानें-तोषला, तरी कृतकार्य जाहला जाण; आणि म्हणून सहजपणेंच कीं कर्मसंगास सांडवला होय-(१४७). तृप्ति झाली म्हणजे सर्व साधनें आपोआपच कीं संपतात-सरतात, बाजूस होतात. कर्मानें कांहीं तसली आत्मतुष्टि आत्मस्वरूपीं-स्वरूपानंदामध्यें-पावणारी होत नाहीं! (त्यानें-ब्रह्मनिष्ठानें-केलेल्या कर्मानें लाभ अर्थ कांहींच नसतो; तसेंच कांहींएक कर्म न केलें तरी कोणत्याहि तऱ्हेची हानीहि नाहीं, आणि असा ह्या पुरुषाचा-सर्वभूतेषु-चराचर भूतमात्रामध्यें कोणत्याहि प्रकारचा अर्थ-व्यपाश्रय-पदार्थ, वस्तु नाहीं कीं ज्याच्या आश्रयावर लाभ का हानी अवलंबून आहे)-(१४८). जोंपर्यंत, हे अर्जुना! तो बोध मनास सांपडत नाहीं तोंपर्यंत ह्या साधनांना भजावें, अनुसरावें लागतें-(१४९). याकरितां (आणि म्हणून) तूं नियत (नित्य, सदोदित, कामना-इच्छारहित असा

योग्य-उचित) होऊन (स्वधर्मे राहाट)-स्वधर्मास आचर, (स्वधर्मांत वाबर)-(१५०). स्वधर्मात वावरण्यानें-स्वधर्म आचरण्यानें जे निष्कामतेस अनुसरले-हे पार्था! तत्त्वतः ते-सत्य (वास्तविक स्वरूपानें, खरेपणानें-मोक्षपद, कैवल्यपद स्वरूप प्रतिष्ठा, अद्वितीय,) ब्रह्मभाव-ह्या जगीं पावले-(१५१).

## स्वकर्मानें संसिद्धि प्राप्त होते-लोकसंग्रह होतो-त्याबाबत जनकाचें व श्रीकृष्णाचें उदाहरण : (१५२-१७१)—

जनक आदिकरून सार्वभौमत्व पावलेलेसुद्धां अशेख कर्मजात न सांडतां न सोडताहि मोक्षसुख पावते झाले-(१५२). स्वतःसच आचरण्याचें केल्यानें-जें आपण स्वतः आचरल्यानें-लोकांस आपलें कर्माचरण पाहण्यास-शिकण्यास मिळेल-(१५३). त्यांना मार्ग-वळण सांपडेल, देखी लागेल लोकां यथा, प्रसंगानेंच कीं, मग अपाय तो टळेल कीं-(१५४).

### थोरांचा कित्ता-कळकळीचें स्वमत :

देखे पाहा कीं, जे कृतकृत्य झाले-प्राप्त अर्थ झाले जे का-निरिच्छता, निष्कामता पावले, त्यांना लोकांसाठीं कर्तव्य तें उरलें आहेच कीं-(१५५). मार्गानें-मार्गामध्यें आंधळ्याप्रमाणें पुढें देखणा, डोळससुद्धां चालत आहे जसा का-तसा अज्ञानांस धर्म आचरून प्रकटावा, उघड-स्पष्ट करावा, दाखवावा, प्रकाशवावा-(१५६). अहो, असें जर नच करावें तर मग अज्ञानांस काय तें उमजणारें-उमजणारें-होईल त्यांनीं ह्या मार्गास कोणत्या बरें प्रकारें जाणावें तें?-(१५७). एथ वडील-ज्ञानानें अनुभवानें मोठे,-जें जें करिती त्यांच्या वागणुकीसच "धर्म" म्हणतात; व तोच धर्म इतर दुसरे सर्वसाधारण सकळ लोक आचरतात-(१५८). असें हें सहजस्वभावेंकरूनच कीं होत असतें, म्हणून कर्म सांडूं नये. संतांनीं तर विशेषेंकरून-(स्वतः कृतार्थ होऊन दुसऱ्यांस मार्ग दाखविण्यास तयार झालेले पुरुष त्यांना संत म्हणतात-त्यांनीं तर) स्वधर्माचरण केलेंच पाहिजे; स्वधर्मेच वागविला पाहिजे. स्वधर्माचरण-संबंधाचें-संपर्काचें, आसक्तीचें, मैथुन, स्पर्शाचें केलेंच पाहिजे-(१५९). आतां दुसऱ्यांचीं उदाहरणें तीं कशास बरें हे अर्जुना! पाहा कीं, मीच स्वतः ह्या कर्म-व्यवहारांत वागणारा आहे कीं, वर्ततों कीं!-(१६०).

काय संकट मला, जें का मी कोणत्या एखाद्या इच्छेनें, आर्ततेनें धर्मास आचरत आहे, असें जरी कां म्हणणें केलेंस-(१६१). तरी पुरतेपणास-पूर्णतेस-दुसरा आणीक ह्या जगीं नाहीं. अशी सामग्री, साहित्य, साधनें, विपुलता, उपकरणें माझ्या अंगीं आहेत हें तूं जाणतोच आहेस-(१६२). (समुद्रानें नेला होता तो त्याचेकडून परत आणून गुरू संदीपनास दिला. ही गुरुदक्षिणा संदीपनानें श्रीकृष्णास मागितली होती)-गुरु सांदीपनीचा मृत पुत्र आणिला, तो थोरपणाचा, महत्त्वाचा पराक्रम तूं पाहिला आहेसच-असा तोहिपण मी निरिच्छपणानें कर्मांमध्यें वर्तत आहें-कर्म कर्तव्यांत वागतों आहे ना!-(१६३). कसा तो पण स्वधर्मामध्यें वर्तत, वागत आहे (कीं), जसा का सकामच एक होऊन (असेल जो-तो जसा का) वागेल तसाच कीं मी वागत आहे. त्याच एका हेतूसाठीं-उद्देशासाठीं-जें कां लोककल्याण साधावेंच सर्वथैव!-(१६४). कारण काय, तर जें कांहीं हे सर्व भूतजात-भूतमात्र-तें केवळ आमच्याच आधीनपणावर स्वस्थ असलेलें, आणि म्हणून आम्हीं बरळ, भ्रष्ट, नच व्हावें कीं-(१६५).

आम्हीं पूर्णकाम होऊन आनंदांत राहिलों व स्वधर्माचरणास सोडून दिलें तर ह्या प्रजांना-ह्या लोकांना-तरणोपाय कसा पोहोंचेल-सांपडे तो?-भवसागरांतून पार पडेल, तरेल, वांचेल, फेडीचें होणें-मोक्षाचे होणें तें तेथें आपलेंसें होईल?-(१६६). ह्या लोकांनीं, प्रजांनीं, आमची वाट पाहावी, मार्गप्रतिक्षा करावी, व मग वर्तनक्रम पाहावा-वर्तनावर जाणावी. तेथें समाजस्थैर्य, लोकाचार आदि सर्व नाहिंलें होईल ना!-(१६७).

म्हणून येथें जो समर्थ–सर्वज्ञतेनें योग्य (आथिला आहे)–त्यानें विशेषेंकरून कर्मास पाठ दाखवूं नये–सोडूं नये–(१६८). देख कीं–फळाच्या इच्छेनें कामुक, विषयासक्त, कामातुर, स्त्रीलोभी जसा आचरतो, तसा निराशाहि कर्मी भर व्हावाच की–(१६९). कारण काय तर हे पार्था! वारंवार हा लोकसमाज सर्वथा रक्षणीय, सांभाळण्यालायक–राखणें, जपणें, सांभाळ करणें, रक्षणें) म्हणून–(१७०). सूज्ञ वाडवडिलांनीं घालून दिलेला मार्ग–पद्धत, त्या धोरणानें वर्तावें विश्व म्हणजे मानवसमाज हा कर्मप्रवृत्त व्हावा असें पुढाईत करावें. लोकांस अलौकिक होऊं नये–लोकांस लोकविरुद्ध होऊं नये–(१७१).

## अज्ञ जनांची बुद्धि भ्रष्ट करूं नये : (१७२–१७६)—

हे धनुर्धरा! जे (बालक) मोठ्याच मोठ्या सायासानें, कष्टानें, श्रमानें, स्तन्य म्हणजे दूध पिणारें, तें पाक म्हणजे पक्वान्न कसें बरें जेवील? आणि म्हणून पक्वान्नें तीं बालकास सहज विनोदानेंसुद्धां देऊं नयेत, न द्यावीं–(१७२). त्याप्रमाणें ज्यास कर्मी–कर्म करण्यांत अयोग्यता त्याजप्रत, विनोदानेंसुद्धां, खेळतां खेळतां नैष्कर्म्यता–कर्मापासून अलिप्तता–आदिकरूनि न प्रगटावी!–(१७३). त्याच्या कल्याणाचें कर्म आचरविण्यासाठीं गौरव करावा, महत्त्व सांगावें; आणि कर्म करूनहि फलाशा सोडावी–हें प्रत्यक्ष आचरणात दावावें –(१७४). मग तेथें वर्णाश्रमधर्माच्या संरक्षणासाठीं–रक्षणासाठीं–कर्मसंगामध्यें वर्तता तो कर्मबंध अंगीं वाजेल–अंगीं आदळणार नाहीं–(१७५). बहुरूपी–सोंग घेणारे–तेथें राव अथवा राणी असा स्त्रीपुरुषभाव मनीं नाहीं, पण लोकांच्या समजुतीसाठीं, लोकाचाराच्या–लोकांशीं व्यवहार वागणुकीसाठीं, तशीच संपादणी–समजुतीची करतात–(१७६).

## प्रकृतीचीं कर्में अज्ञानी "मी करतों" असें म्हणतो : (१७७–१७९)—

दुसऱ्याचें ओझें जरी का आपल्या डोक्यावर घेणें आहे, तरी मग कां बरें तें जड वाटणार नाहीं? तेथें मान अवघडणें होतें–वांकणेंच होतें–(१७७). त्याप्रमाणें प्रकृतिधर्मानें जीं शुभाशुभ कर्मे निपजतात, तेथें मतिभ्रमामुळें तो "मी त्या कर्माचा आहे" असें म्हणतो–(१७८). असा देहात्मबुद्धि असलेला, अहंकारारूढ, देहालाच मी म्हणणारा–एकदेशी–एका देहापुरतीच आत्मव्याप्ति मानणारा, असा मूढ फसलेला, मूर्ख बनलेला –त्यास हा समजण्यास, आचरण्यास गूढ परमार्थ प्रकटावा नच!–(१७९).

## हित सांगितलें होईल चित्त देऊन ऐक–ब्रह्मतत्त्ववेत्ता प्रकृतीचीं कर्में आपल्या शिरावर घेत नाहीं : (१८०–१८३)—

प्रस्तुत हें असें असो; अतां तुजला हित सांगावें असें आहे तें चित्त देऊन हे अर्जुना, अवधारण्याचें–ऐकण्याचें करावेंस!–(१८०). तत्त्वज्ञानियाच्या अंगचा जेथें का कर्मजात निपजतें असा अगदींहि प्रकृतिभाव नाहीं–नसतो–(१८१). ते देहाभिमान सांडून–टाकून–सोडून प्रकृतीपासून होणारे ते गुण व कर्में ओलांडितात व देहानें फक्त साक्षीभूत होऊन वर्ततात–वागतात–(१८२). आणि म्हणूनच–(देह आहे नाहीं फक्त साक्षी स्वतः होऊन) जरी शरीरधारी तरी कर्मबंधामध्यें अडकत नाहींत; जसा का सूर्य भूतमात्रांच्या हालचालीमध्यें (व्याप) अडकला होत नाहीं–(१८३).

## प्रकृतीचीं कर्में मी करितों असें म्हणणारे मूर्ख : (१८४–१८५)—

तोच कर्मानें लिंपतो जो गुणभ्रांती आपणावर घेतो व प्रकृतीच्या सर्वथैव परतंत्र–गुण × कर्में यांच्या खटाटोपामध्येंच कीं वर्ततो–(१८४). इंद्रियें गुणांच्या आधारावरच आपआपल्या हालचालीमध्यें व्यापारतात–राहाटतात, एऱ्हाते परकर्म इंद्रियांचें कर्म बलात्कारानेंच बळजबरीनेंच कीं आडवून घ्यावे होतात, मिळवून घेतात–(१८५).

**ईश्वराचे ठिकाणीं सर्व कर्मांचा संन्यास करून युद्ध कर : (१८६-१९१)—**

–करितां उचित–विहित कर्में सर्व त्वां आचरून परमात्म्याचें ठायीं अर्पण करावीत खरी, पण चित्तवृत्ति ती आत्मस्वरूपाच्या ठायीं अर्पण करावी–सोंपवावींत–रचावींत–स्थापावींत–(१८६). हें कर्म, तेथें मी कर्ता आहे, अथवा अमुक एका हेतूसाठीं का अर्थासाठीं कर्म तें करीन असा अभिमान चित्ताचे ठायीं शिरकावूं देऊं नये–अभिमान तो एकदम कीं चित्तांत शिरण्याचें पाहतो, तेथें सावध राहून अभिमानास चित्ताचे ठायींचे होऊं देऊं नये–(१८७). तुंवा शरीरपर नच व्हावें, देहच मी अशा भावनेचा नच होता कामना-जात ( म्हणजे काम्य कर्म सांडावें– ) व वेळेस प्राप्त झालेले सकळ भोग भोगावेत –(१८८). आतां हातीं कोदंडरूपी धनुष्य घेऊन ह्या देह–शरीररूपी रथामध्यें आरूढ हो, समाधानाचा होऊन वीर असा हो, वीरवृत्तीस आलिंगन दे–(१८९). जगीं लौकिक कीर्ती रूढवावी, स्वधर्माचें महत्त्व–आदरभाव वाढवावा; भूतळ ( मेदिनी ) लोक हा धर्मापमानाखालीं दडपलेल्यास (स्वधर्मास)–सोडीव–(१९०). पार्था, आतां निःशंक होऊन ह्या संग्रामामध्यें चित्त दे. येथें युद्धावांचून दुसरें कांहींहि बोलों चालों नये–(१९१).

**श्रद्धेनें अनुष्ठान करील तो कर्मबंधांतून सुटेल : (१९२–१९३)—**

ज्यामध्यें कुटिलपणा, त्रास इत्यादि हेतु नाहींत असें स्पष्ट सरळ माझें मत हें सन्मानपूर्वक ज्यांनीं म्हणून स्वीकारावें त्यांनीं तें पूर्ण निष्ठेनें आचरावें–ज्यांनीं म्हणून हें माझें मत मोठ्या आदरानें स्वीकारलें, त्यांनीं मोठ्या श्रद्धेनें तें अनुष्ठावें–(१९२). ते सकळ कर्मामध्यें वर्तत असतां कर्मरहित असें जाण. म्हणून हें मत निश्चितपणें करणीय असें आहे–(१९३).

**ईश्वरार्पण बुद्धीनें कर्म न करणाऱ्यांचा नाश होईल : (१९४–२०१)—**

–अथवा प्रकृतिमंत होऊन व इंद्रियांना लाड, लळा देऊन जे का हें माझें मत अव्हेरून ओसंडतील, टाकून देतील–टाकतात–(१९४). जे हें सामान्यत्वेंच–सर्वसाधारण, मध्यम, साधारण, धर्म कीं गणतील, मानतील, मानतात, लेखतात; व अवज्ञा करून देखतील, देखते होतील व हा नुसता अर्थवाद–अतिशयोक्ति-पूर्ण वाद आहे असें म्हणतील–(१९५). ते मोहरूपी वारुणीनें भुललेले, विषयरूपी विषानें घेरिले–वेढिले (घारले), अज्ञान, अविद्यारूपी चिखलामध्यें बुडाले असें (पंचक्लेशीं बुडाले. . . अंग) निःसंशयतेनें मानच–जाण, समज–(१९६). असें पाहा कीं, लक्षांत घे कीं–शवाच्या हातीं दिलेलें रत्न जसें वायांच कीं गेलें ना?–अथवा जात्याच जो अंध त्यास उजाडलें, दिवस उगवला असें म्हटलें तर तेथें प्रमाण कांहींच सांपडविणारें नव्हें!–(१९७). चंद्राचा उदय हा वायसाच्या–कावळ्याच्या–उपयोगाचा नाहीं, उपयोगास येत नाहीं. त्याप्रमाणें विवेक येत नाहीं–असे मूर्ख, धूर्त जे आहेत त्यांना विवेक केव्हांहि रुचणारा नव्हेच–नच रुचणारा कीं!–(१९८). त्याप्रमाणें हे पार्था! जे ह्या परमार्थास विमुख त्यांसीं कधींहि सर्वथा भाषण, संभाषण करूंच नये कीं!–(१९९). आणि म्हणून या कारणास्तव, तें परमार्थतत्त्व हें मानीतच नाहींत व निंदाहि पण करूं लागतात–सांग कीं, पतंग काय प्रकाशास सहन करूं शकतात–शकतील–साहतात–साहणारे होतील?–(२००) प्रकाश न साहणारे पतंग ते दीपास आलिंगन देऊं गेल्यानें तेथें मरण तें बिनचूक येणारें असें केव्हांहि; त्याप्रमाणें विषयामध्यें आचरण तें, वर्तणूक ती–आत्मघातच कीं म्हटलें–आत्मघातरूपी विषयाचारानें अचूक मरण वोढवणारें; येणारें–(२०१).

**ज्ञात्यांनीं इंद्रियांचे लाड करूं नयेत : (२०२–२०४)—**

म्हणून जाणत्या पुरुषानें कौतुकादिकेंकरून इंद्रियें लाडवावींत ना–लळावीं ना!–(२०२). अहो, काय सर्पाबरोबर खेळतां येईल? अथवा व्याघ्रसंसर्ग सिद्धीचा होईल काय? सांगा कीं, हलाहल विष जर सेविलें तर तें काय जिरणारें होईल?–जिरणारें नव्हेंच?–(२०३). आणखीहि कांहीं प्रमाणें तीं काय–अहो, खेळतां खेळतां

आग लागली तर मग अग्नि जसा भडकला–इतका वाढला कीं तो सावरणें कठीण होतें–त्याप्रमाणें इंद्रियांना लळा दिला तर तें भलें नव्हें!–(२०४).

## शरीर कर्माधीन आहे म्हणून जीवांनीं सुखदुःखाकरितां कष्ट करूं नयेत : (२०५–२०९)—

हे अर्जुना, या पराधीना शरीरा–गुणाधीन शरीराच्या सुखासाठीं–कशास ते अनेकविध, विविध विषय-भोग मिळविण्याचें करावें! अहो! भोगरचना ती, शरीरा पराधीना ती का? कशास बरें?–(२०५). अहो, ह्या गुणांच्या आधीन असलेल्या ह्या शरीराकरितां सूर्योदयापासून सूर्यास्तापर्यंत खपून ह्या देहास प्रतिपाळाचें करावें–(२०६). तेथें स्वतःचें सर्वस्वच शिणविलें करून संपत्तिजातें मिळवावीं, अर्जवावीं, ज्यानें का तेथें त्यानें आपला स्वधर्म (उदयधर्म) सांडून, देहातेंच एका पोसावें तें कां बरें नच! गलेलठ्ठतेची पुण्याई ती द्यावी कीं! –(२०७). अहो, पण असें जाणा कीं–हा पृथ्वी, आप, तेज, वायु व आकाश ह्या पंचभूतांचा संघात जो पंच मेळावा देह शेवटीं पंचत्वास अनुसरणारा–अनुसरेल–तेथें त्या पांचांतच मिळून जाईल ना? त्यास मरण प्राप्त होईल ना? तेव्हां मग कसचा तो आपला शीण परत मिळविणारा, सांपडणारा,–तो शोधावा कुठें बरें मग! –(२०८). या कारणास्तव फक्त एका ह्या केवळ शरीराचें पोषण तें उघड उघड हानीच–फसवणूकच! म्हणून इथें अंतःकरण केवळ देहभरण-पोषणासाठीं देऊं नये–(२०९).

## रागद्वेषाधीन झालेला पतित होतो : (२१०–२१८)—

का बरें तेथें संतोष (संतोष × संताप) प्राप्त होईल! उपजेल! जे का इंद्रियांच्या अर्थासारखा उपजेल, जे का इंद्रियांचा अर्थासारखा–इंद्रियांना अनुकूल–इंद्रियांना आवडेल तसा विषयसेवनेंकरून देह हा पोषिला, तर तेथें मन जें चांचल्याचें तेंच जसें माजवलें होईल! चित्त तें तर मुळींच सांपडणारें नच झाल्यानें, त्या चित्तानें तेथें संतोषास येणें कसचें तें!–(२१०) आणि म्हणून तेथें एका चोराचीच संगत केली असें होतें. जे का संभावितपणाचा डौल मिरविणाऱ्या–डौल आणणाऱ्या भामट्याची संगत ती क्षणमात्राची जशी; कारण तो वेशीच्या बाहेर–देहरूपी नगराच्या बाहेर जाईपर्यंतच ठीक!–(२११). बाप्पा अहो! विषाची मधुरता ती लगेच चित्तांत आवडी उपजवते–पण परिणाम जर विचारला तर प्राण हरण होणारे जसें!–(२१२). इंद्रियांच्या ठायीं काम असतो तो सुखाची दुष्ट आशा वाढवितो–मासा गळाला लावलेल्या मांसाच्या तुकड्याला जसा भुलतो–(२१३). पण त्यामध्यें गळ आहे–जो प्राण घेऊन जाईल–तो गळ, कांहीं इच्छा-प्रेमाच्या, अभिलाषाच्या, वेगामुळें झाकलेलें, झाकलेपणामुळें–अदृश्यतेमुळें–होणें झाल्यानें, ठाउका होत नाहीं!–(२१४). ह्या अभिलाषानें तसें केलेंच (करावें) होईल. विषयाची आशा धरलीच–धरावी होईल. तरी मग क्रोधरूपी अग्नीच्या–अनळाच्या स्वाधीन होआवें–होईजेल–होणें होईल–(२१५). जसा मृगाला पकडण्याचा हेतु साधण्यासाठीं–सिद्ध करण्यासाठीं, बुद्धि-युक्तीनें आधावयास–पारधी मृगाला (मारण्याची संधी साधून, व्यापून, कवळून त्यास) घाताच्या संधींत आणतो–(२१६). इथें तशीच कीं परी म्हणजे प्रकार (तऱ्हा, रीती) आहे. म्हणून विषयाचा संग हा तुज न होवो, हे पार्था! हे दोन्ही काम व क्रोध घातक (मारेकरी जाण–असे प्रहार, वध, संहार) उच्छेद, नाश करणारे–(२१७). याकरितां आश्रय नच तेथचा करावा, मनानेंसुद्धां आठवण –आठव न धरावा, एक आत्मानुसंधानाचा जिव्हाळा, निजवृत्तीचा ओलावा विसरूं नये–नासूं न द्यावा, नाहींसा होऊं न द्यावा–(२१८).

## स्वधर्माची आवश्यकता–स्वधर्म परधर्मापेक्षां कठीण असला तरी तोच कल्याणाला कारण : (२१९–२३०)

आपला आवडता धर्म जरी अडचणीचा व त्रासाचा असा, तरी तोच बरा आचरावा–(२१९). दुसरा जो परक्याचा आचार तो पाहण्यास वरवर बरा वाटला, पण आचरणानें आपल्याच कीं धर्मांत वावरण्याचें

करावें आपलाच धर्म बरा आचरावा-(२२०). असें पाहा कीं, सांग कीं, ब्राह्मण दरिद्री असला म्हणून काय त्यानें शूद्राच्या घरच्या पक्वान्नावर तात्र मारावा?-(२२१). शूद्राघरींचीं पक्वान्नें द्विजांनीं सेवन करावींत? असलें हें अयोग्य तें नच करावें-कसें बरें तें उचित होईल? अहो, जें अग्राह्य तें कां बरें इच्छावें? अथवा इच्छिलें तेंचि ते पावावें, गांठावें, मिळवावें, पोहोंचावें असें हें विचार करून पाहा-(२२२). असें जर नाहीं तर मग लोकांचीं चुनेगच्ची घरें पाहून आपलीं राहतीं गवताचीं घरें केविं मोडावींत तीं? आपली झोंपडी पाडून टाकावी काय?-(२२३). ज्याप्रमाणें आपली स्त्री, पत्नि, वनिता जरी कुरूप असली तरी तीच भोगावी हेंच बरें-यातच भलेपणा आहे!-(२२४). त्याप्रमाणें भलताच कठीण व आचरण्यास-आचरतां जरी (द्वाड) दुर्घट, तरी परलोकींचा सुखकर सखा स्वधर्मच एक कीं!-(२२५).

अहो, साखर व दूध हें गौल्यें-गोडीनें माधुर्याविषयीं प्रसिद्ध; पण ज्याला जंताची व्याधी आहे त्यानें तें कसें ध्यावें? कारण साखर व दूध कृमिदोषीं विरुद्ध असे!-(२२६). असें असूनसुद्धां जरी का सेविलेंच-आवड कीं एक उरेल-काय त्या व्याधीची, व्याधि व्हावीच अशी, म्हणावी! कारण काय, तर तें कांहीं पथ्यकर नव्हें-हितकर होणारें नव्हें-(२२७). म्हणून याजकरितां जें दुसऱ्यांना विहित-योग्य व आपणां स्वतःला नच योग्य तें जर का हिताची गोष्ट विचारावयाची-तर आचरूं नये-(२२८). या स्वधर्मास अनुष्ठिल्यास जीवितास खर्चीं पडणें झालें तर तोहि चांगला असाच कीं इहपरलोकीं श्रेष्ठ कीं-(२२९). असें सर्व देवाचे शिरोमणी जे शारंगपाणी भगवान् श्रीकृष्ण बोलत आहेत, तेथें अर्जुन म्हणत आहे कीं,-अहो देवा! एक विनवणी आपणांस आहे कीं-(२३०).

### मनुष्याला पापाकडे कोण प्रवृत्त करतो : (२३१-२३८)—

हें जें कांहीं तुम्हीं सांगितलें तें सकळहि म्यां ऐकिलें! तरीहिपण माझें जें कांहीं एक अपेक्षित असें मनांत आहे तें आपणास विचारावें, असें वाटतें-(२३१). तरी देवा, हें असें कसें हो? कीं ज्ञानियांची आत्मस्थिति चळते-ते तर मार्ग सोडून देऊन आडमार्गाला जात आहेत असे दिसतात-(२३२).

#### काम क्रोध हे ज्ञानाचे शत्रु :

अर्जुन म्हणतो-सर्व जाणणें असें जें तें "टाकावें काय, स्वीकारावें काय" हें जाणूनहि ते दुसऱ्याच्या धर्मात वावरतात तें कोणत्या कारणानें?-(२३३). भूस का बीज यांचा निवाडा आंधळा कांहीं देऊं (करूं) शकत नाहीं! देखणा-डोळस, जाणता तोहि क्षणभर आंधळयासारखाच कीं, कां बरें, वागतो तो? (२३४). देहाचा संग जो तो ते सांडतात, देहबुद्धीस ते विटतात, तेच कीं आतां संसर्ग करितांहि समाधान पावत नाहींत. वनांत राहणारे जे ते सुद्धां लोकवस्तींत येऊन मिळतात-(२३५). आपण तर स्वतः लपतात; सर्वथैव पाप तें चुकवितात. पण अहो! जसें का बलात्कारानेंच त्यांना त्या पापांत ढकललें जसें का असे-घातले जातात-तेथेंच त्या पापांतच पडतात-(२३६). ज्याचा जीवानें त्रास-वीट-घेतलेला असतो तोच विषय अत्यंत दृढ होऊन बसतो; व त्या विषयाला चुकवायचा यत्न केला तरी तो त्याला गुरफटून घेतो. वासना, कामना हीच विंवसी कीं-(२३७). असा बलात्कार येथें दिसतो आहे; तो कवणाचा आग्रह असतो, हें श्रीहृषिकेशांनीं बोलावें असें पार्थ म्हणत आहे-(२३८)

### काम क्रोध जीवाला पापाकडे प्रवृत्त करतात : (२३९-२५९)—

तेव्हां, हृदयास रमविणारा, आणि योगीजन ज्याची निष्काम बुद्धीनें इच्छा करतात असा जो पुरुषोत्तम तो म्हणाला :-सांगतों ऐक-(२३९). श्रीभगवान् म्हणतात कीं-तरी असें पाहा, काम ही विषयवासना, व द्वेष-ज्यांचे ठायीं कृपेला रीघ नाहीं ते यमाच्या-कृतांताच्या-जागीं मानले जातात-(२४०). हे ज्ञानरूप

द्रव्यावरचे नाग, विषयरूप दरींतील दुष्ट सावज, भक्तिमार्गाचा नाश करणारे मारेकरी जे का-(२४१). हे देहरूप दुर्ग म्हणजे किल्ल्यातील धोंड-म्हणजे मोठाले दगड. हे इंद्रियरुपी गावकुसू कोंडवाडे, डोह (तिन्हीं अर्थ) तिहेरी असे. भ्रांति मोह आदिकरून ते जगावर परिणाम करणारे आभंडच-(२४२). हे मानस म्हणजे मनाचे रजोगुण, समूळपणें आसुरी संपत्तीचे केलेले; याचें पालन-पोषण अविद्येनें केलेलें आहे-(२४३). हे रजापासून उत्पन्न झालेले, पण तमाचे आवडते दोस्त आहेत. त्या तमानें आपलें मोहाचें व प्रमादाचें पद त्यांना दिलें आहे. हे तमोगुणापेक्षांहि जास्त पढियंते होत-(२४४). मृत्यूच्या नगरामध्यें हे मित्रासारखे भले मानले आहेत; कारण काय, तर हे जीविताचे वैरी आणि म्हणूनच कीं-(२४५). ज्यांच्या भुकेलेपणाचें आमिष तेथें तर हें विश्वहि त्यांच्या घासास पुरतें पडेना! त्यांची कुळवाडी, देवघेव, व्यापार आशा ही करीत राहाते -(२४६). सहज कौतुकानें मुठींत कवळिलें, धरिलें (माकडे मुठीं धरिले फुटाणे)-जिला चौदाही भुवनें लहानच, तेथें भ्रांति हीच लाडकी अशी धाकटी बहीण कीं कवळणारी!-(२४७). भ्रांति ही-ही भ्रांति भातुकली खेळूं लागली कीं तीनहि लोक खाऊन टाकते व तृष्णा हिच्या दासीपणाच्या बळावर (विकें) जगली आहे-(२४८). मोह याच भ्रांति व तृष्णा ह्यांना फार मानतो. ह्यांचें अहंकारामुळेंच घेणें देणें होतें व आवडीप्रमाणें हा अहंकार नाचवीत असतो-(२४९). ज्यानें का सत्याचें पोटच फोडलें व त्यांत असत्य तृण कुट भरिला व दंभ हाच ह्या जगीं रूढीचा केला-आरूढविला-(२५०).

शांति साध्वी ती लुबाडली गेली, नागविली गेली-मग माया अविद्या हिसच सर्व शृंगार केला व तिच्या-कडूनच कीं साधुवृंदें तीं दूषविलीं गेलीं-विटाळविलीं गेलीं कीं-(२५१). ह्यांनीं विवेकाचा आश्रय नाहींसा केला. बारा युगांची साल अथवा खालचें सोलून काढिलीं व उपशमाची तर-ऐकणें जें जिवंत असणारें त्याची तर-मानच पार मोडून टाकिली-(२५२). ह्यांनीं संतोषाचें वन तें पेटवून दिलें. धैर्यदुर्ग कोसळून टाकिले. आनंदाचें रोप जें तें तर फेंकून दिलें (सांडिलें)-(२५३). ह्यांनीं बोधाचीं रोपटीं उपटिलीं. सुखाच्या लिपीचें नांवहि पुसून टाकलें. जिव्हारीं-अंतःकरणात-जे तापत्रय (अधिभौतिक, अधिदैविक, अध्यात्मिक) त्यांची आगच कीं एक घातली!-(२५४). हे देहाबरोबर घडलेले असून जीवाच्या अंगांतच राहातात, पण ब्रह्मादिकांनाहि सापडले असें केव्हांहि गुह्यपणें आकळले होत नाहींत-स्पर्श केले जात नाहींत-(२५५). चैतन्याच्या शेजारीं व ज्ञानाच्या पंक्तीला हे बसतात आणि म्हणूनच तर जगाचा सत्यनाश करावयाला हे प्रवृत्त झाले असून, कोणालाहि सावरेनासे का आवरेनासे झाले आहेत!-(२५६). हे जळाशिवाय बुडवितात, अग्नीशिवाय पोळवितात, जाळतात-हें नच बोलतांच मुळीं मुकाट्यानें कीं कवटाळून घेतात!-(२५७). हे शस्त्राशिवाय मारतात, साधतात, दोराशिवाय बांधतात आणि ज्ञानियांस तर पैजेवरच कीं वधतात-(२५८). हे चिखलाशिवाय रोंवितात, पाशाशिवाय कीं गुंतवितात-बळकटपणामुळें हे कुणाचेहि नव्हत-(२५९).

## काम क्रोध ज्ञानास आच्छादून टाकतात: (२६०-२६६)—

ज्याप्रमाणें चंदनाची मुळी सर्पानें कवटाळून घेतली जाते अथवा गर्भस्थास गर्भवेष्टनाची खोळ वेष्टून, आवरून, कवटाळून असते-(२६०). प्रभेशिवाय सूर्य, धुराशिवाय अग्नी कसा तर तेथें कांहींच दिसणारें नाहीं. जसें का दर्पण म्हणजे आरसा-कांच मीनाच्या (पाऱ्याच्या) लेपाशिवाय असेल तर मलहीन, टाकलेलें, मळामुळें निंद्य न्यून-मळकटपणाशिवाय नच असा!-(२६१). त्याप्रमाणें ह्या कामक्रोधांशिवाय एकटे असें ज्ञान आमच्या पाहण्यांत, देखण्यांत नाहीं. जसें बीज हें कोंड्यानें आच्छादिलेलें असेंच कीं निपजत असतें-(२६२). ज्ञान मूळचें पवित्र, पण ह्या कामक्रोधांनीं आडविकेलें तें असल्याकारणानें बुद्धीला कळण्यास कठीण होऊन आहे-(२६३)

**इंद्रियजयानें कामक्रोधनाश :**

अगोदर या इंद्रियांना जिंकावें व मगच तें ज्ञान पावावें होय. रागद्वेषाचा पराभव होईपर्यंत जिंकणेंच एक !-(२६४). यांना जिंकण्यासाठीं जें कांहीं बळ अंगीं आणावें लागतें तें कसें तर जसें का इंधनेंच मुळीं अग्नीस उत्तेजक अशीं-साह्यकर्ती अशीं जाण. जें कांहीं बळ पाहावें तेंच की मुळीं त्यांनाच साध्य होणारें होतें -(२६५). त्याप्रमाणें जेथें उपाय करावेत-व्हावेत ते ते उपाय तर ह्या कामक्रोधांनाच कीं मित्रतेचे असे साह्यकर्ते होतात; आणि म्हणूनच कीं ह्या इंद्रियांनाच ह्या जगीं अगोदर जिणावें असें आहे-(२६६).

**काम क्रोध जिंकण्यास उपाय इंद्रियजय : (२६७-७३)—**

अशा ह्या संकटांतून सुटण्याला असें हे बोलणेंच मुळीं अरिष्ट दाखविणारें, का संकटच एक घाबरून सोडणारें; पण येथें नच घाबरून जातां एक उपाय तो भलेपणाचा करावा-तो मानवला, साध्य झाला तर (पाहा)-सांगतों ऐक-(२६७). याचा पहिला घरटा-मुख्य स्थान-इंद्रियें होत व ह्या इंद्रियांतूनच कीं कर्माकडे प्रवृत्ति वीते, वर्तन होतें; म्हणून ती इंद्रियांची विषयप्रवृत्ति नाहींशी करून ह्या इंद्रियांना जिंकावें -(२६८). व मगच मनाची धांव थांबेल, बुद्धि ही त्यांतून सुटेल-एवढ्यानेंच दुष्टाचा आधार-ताग-आधाराचें ठिकाण नाहींसें होईल, मोडून जाईल-(२६९). हे (कामक्रोध) अंतरामधून जरी फिटले (गेले) तरी निःसंशय जाण मेले, निवटले जसे रश्मीवीण मृगजळ उरलें नाहीं-रश्मी (सूर्यकिरण) नाहींत तर मृगजळ नाहीं-(२७०).

**आत्मस्वातंत्र्यप्राप्ति :**

तसे ते रागद्वेष, कामक्रोध जरी का निमाले, तरी मग ब्रह्मीचें कीं पूर्ण स्वातंत्र्य मिळालें-आलें समजावें; व मग तो आपलें सुख आपणच कीं भोगतो, भोगूं लागतो, उपभोगतो-(२७१). ती ज्ञानदा, ते अनुभविक सद्‌गुरु आणि सच्छिष्य यांतला उपदेश-गोष्टी, जें आत्मपद, शिवपद व जीवभाव यांचें ऐक्य-तेथेंच स्थिर राहून असा त्या आत्मानंदांतच रममाण होऊन, तेथेंच समरस होऊन असा तेथून मुळींच बाजूस होऊं नको ! -(२७२). सकळ सिद्धांताचा राजा-राव, देवी लक्ष्मीचा नाहो-नाथ, पति-हे राया, ऐक कीं असें तो बोलिला-वदला (बोलून गेला, ऐसे बोल बोलता झाला)-(२७३). आतां पुनरपि, पुन्हां पुढती तो अनंत-देव पुरातन अशी एक गोष्ट सांगणार आहे-सांगेल, तेथें अर्जुन-पंडूचा सुत-प्रश्न करील-(२७४). त्या बोलणें केल्याचा पाड-महत्त्व तेथें रसवृत्तींचा निवाडा होणार आहे; श्रोत्यांना त्यापासून श्रवणसुखानुभवाचा-रसभरित भाषणाचा सुकाळ होईल-(२७५). श्रीनिवृत्तीचे दास, श्रीज्ञानदेव म्हणतात कीं-ज्ञानाचा चांगला उत्साह धरून मग प्रश्नोत्तरी बोली-श्रीहरि-पार्थाचा संवाद तो ऐका, त्याचा अनुभव घ्या, भोगा, उपभोगा, अनुभवाचा करा-(२७६).

**॥ ॐ तत्सत् कृष्णार्पणमस्तु ॥**

---

॥ श्रीगणेशायनमः ॥



वसुदेवसुतं देवं कंसचाणूरमर्दनम् ।
देवकीपरमानंदं कृष्णं वंदे जगद्गुरुम् ॥

॥ हरिः ॐ । श्रीगुरुभ्योनमः । श्रीगोपालकृष्णायनमः ॥

# श्रीज्ञानेश्वरी-सुबोधिनी

## अध्याय तिसरा

## कर्मयोग

**अर्जुन उवाच—**

**ज्यायसी चेत्कर्मणस्ते मता बुद्धिर्जनार्दन ।**
**तत्किं कर्मणि घोरे मां नियोजयसि केशव ॥ १ ॥**

[ज्यायसी [ज्यायस् = वडिल, श्रेष्ठ, उत्तम, मोठे, विस्तृत, वयांत आलेला, जीर्ण, वृद्ध] = श्रेष्ठ. चेत् = जर, तथापि. कर्मणः = कर्मापेक्षां (कर्मयोगापेक्षां बुद्धियोग श्रेष्ठ, ज्ञाननिष्ठा श्रेष्ठ असें.) ते मता = तुमच्या मतें आहे. मां घोरे कर्मणि किम् = तर मग मजला घोर युद्धकर्मांत कां बरें (युक्त करीत आहांत?) नियोजयसि = (युज्+नि = नेमणें; प्रेरणा करणें; युक्त करणें) युक्त करण्याचें करीत आहांत.]

**अन्वय :** जनार्दन, ते मता कर्मणः बुद्धिः ज्यायसी चेत् । तत् घोरे कर्मणि मां केशव । किम् नियोजयसि ।

**अर्थ :** अर्जुन म्हणाला, हे जनार्दना! जर तुम्हांला कर्म करण्यापेक्षां बुद्धीचा आश्रय श्रेष्ठ वाटतो तर तुम्हीं हें मला कर्म—व तेंही असलें घोर कर्म—कां बरें करावयास लावतां? (१).

**मग आईका अर्जुने म्हणितलें । देवा तुम्हि जें वाक्य बोलिलें ।**
**ते म्यां निकियापरि परिसिलें । कृपानिधि ॥ १ ॥**

**जेथ (तेथ) कर्म आणि कर्ता । उरेचिना पाहतां ।**
**ऐसे मत तुझें श्रीअनंता । निश्चित जर्न्हि ॥ २ ॥**

**तरी मातें कैंवि श्रीहरी । म्हणसी पार्था संग्राम करी ।**
**ईये लाजेसिना महाघोरि । कर्मि सुता ॥ ३ ॥**

**हां गा कर्म तूंचि अशेष । निराकारिले निःशेष ।**
**मग मज करवि हें हिंसक । कां करविसि ॥ ४ ॥**

**तरि हे विचारि श्रीहृषिकेशा । तूं मान देसी कर्मलेशा ।**
**आणि म्हेलणि हे हिंसा । करवित आहसि ॥ ५ ॥**

आइका-आइका. देवा जे तुम्हि-देवा तुम्हि जे. निकियापरि-निके = लहान मुलांप्रमाणें चांगलें. परिसिलें = ऐकिलें (१). (जेथ) येथ-तेथ. उरेचिना (मुळींच उरत नाहीं) पाहाणें देखणें केलें तर, उदय पाहाणें पाहिलें जर. कर्म आणि कर्ता = कर्मही नाहीं व कर्ताही नाहीं-ऐसें तुझें मत निश्चित जन्हि-जरि = असें तुमचें मनोगत-मत-अभिप्राय-हें श्रीअनंता जरी का निश्चित असें आहे (२). लाजेसिना-लाजसी (लाजा होम, लज्जा = मंदाक्षम्) ना = तुम्ही संकोचत कां नाहीं. संग्राम = युद्धकर्म, युद्ध करणें. महाघोरी कर्मि सुता लाजेसिना = युद्धकर्मात मला घालतांना-लोटून देतांना-तुमच्या मनाला संकोच कसा वाटत नाहीं तो. (ह्रीः, त्रपा, व्रीडा, लज्जा इति लज्जायाः।) (३). निराकारिले (निराकरणं = खंडन, निषेध)-निकारिसी = निषेधाचें करीत आहेस. (कृ + निरा = घालवून देणें, खंडन करणें.) मज करवि-तरि मज करवि. हिंसक = हिंसक प्राणघात करणारें युद्धकर्म. अशेष = सर्व. निःशेष = सर्वथैव. [निराकार = (१) आकाररहित, वेश नसलेले, विनयी. (२) परमेश्वर. (३) निंदा.] (४). हे-हेचि. मान देसी-मानु नेदसि = कर्माला महत्त्व देतां व देत नाहीं. कर्मलेशा = लेशभर कर्माला [लेशः = सूक्ष्मम्, श्लक्ष्णणम्, दभ्रम्, कृशम्, तनु, मात्रा, त्रुटि, लव, लेश, कण, अणु ११ इति सूक्ष्मस्य (अमर)।]. म्हेसणि-येसणि = येवढी-एवढी घोर. आहास-आहासी = करवीत आहेस (५).

यावर अर्जुनानें म्हटलें तें ऐका कीं-देवा, तुम्हीं जें (वाक्य) बोलिलांत तें मी (म्यां) चांगल्या प्रकारें, हे (लक्ष्मीपति) ऐकिलें (परिसिलें). (१)

तेथें कर्म व कर्ता मुळींच उरत नाहीं, असें जर तुमचें मत-अभिप्राय-निश्चित असेल तर मग...... (२)

मजला हे श्रीहरी घोर युद्धकर्मात (कर्म करण्यांत घालतांना) लोटून देतांना तुमच्या मनास संकोच कसा वाटत नाहीं बरें! (३)

समूळ-अशेष-कर्म सोडण्यास सांगतां व मग ज्यांत हिंसा-जीववध होतो असें युद्ध कां बरें मजकडून करविण्याचें करितां? (४)

श्रीहृषीकेशा, तुम्हीं हें विचारांत घ्या कीं, तुम्हीं कर्माला बिलकुल महत्त्व देत नाहीं आणि एवढी घोर युद्धासारखी हिंसा मजकडून करवीत आहांत कीं— (५)

**व्यामिश्रेणेव वाक्येन बुद्धिं मोहयसीव मे ।**
**तदेकं वद निश्चित्य येन श्रेयोऽहमाप्नुयाम् ॥ २ ॥**

[व्यामिश्रेण + इव वाक्येन = (व्यामिश्र = मिश्र, संदिग्ध, संशयित) संदिग्ध, (वाक्य = आज्ञानें) भाषणानें जणुं काय. मे बुद्धिं मोहयसि इव = मतिभ्रम; प्रेमाचें वेडच एक अशी माझी बुद्धि झाली आहे. एकं तत् निश्चित्य वद = निश्चित-उपदेश; ठरलेलें; ठाम मत; सिद्धांत; निर्णय. येन अहम् श्रेयम् आप्नुयाम् = एक जें कांहीं तें याजसाठीं बोलावें, ज्यायोगें श्रेय म्हणजे पुण्य-कल्याण-मोक्षच-एक मला भेटेल-मिळवितां येईल, मिळेल, मी मिळवीन, मी व्यापून असेन.]

**अन्वय :** मे बुद्धिम् व्यामिश्रेण इव वाक्येन मोहयसि इव । एकं तत् निश्चित्य वद येन अहम् श्रेयम् आप्नुयाम् ।

**अर्थ :** घोटाळा उत्पन्न होण्यासारख्या ह्या वाक्यांनीं (तुमच्या भाषणानें) मला वाटतें तुम्हीं माझ्या बुद्धीस मोहांत पाडीत आहांत. तर देवा! ज्यायोगानें माझें परम कल्याण होईल अशीच निश्चितपणाची गोष्ट मला सांगावी (२).

देवा तूंचि ऐसें बोलावें । तरि आम्हीं नेणतीं काय करावें ।
आतां संपलें म्हणो आघवें । विवेकाचें ॥ ६ ॥

हां गा उपदेश जर्‍हि ऐसा । तरी अपभ्रंश तो कैसा ।
आतां पुरला आम्हां धिंवसा । आत्मबोधाचा ॥ ७ ॥

वैद्य पथ्य वारूनि जाये । मग जरी आपण विषय सुये ।
तरी रोगिया कैसेनि जिये । सांगें मज ॥ ८ ॥

जैसें आंधळें सुईजे आव्हांटा । कां माजवणें दिजे मर्कटा ।
तैसा उपदेश हा गोमटा । वोडवला आम्हां ॥ ९ ॥

मी आधींचि कांहीं नेणें । वरि कवळिलें मोहें येणें ।
श्रीकृष्णा विवेक याकारणें । पूसिला तुज ॥ १० ॥

तंव तुझी एकेक नवाई । येथ उपदेशामाजी गावाई (गोवाई) ।
तरी अनुसरलेया कायी । ऐसें कीजे ॥ ११ ॥

आम्हीं तनुमनजीवें । तुझिया बोला वोटंगावें ।
आणि तुवांचि ऐसें करावें । तरी सरलें म्हणें ॥ १२ ॥

आतां ऐसियापरी बोधिसी । तरी निकें आम्हां करिसी ।
येथ ज्ञानाची आशंका कायसी । अर्जुन म्हणे ॥ १३ ॥

तरी ये जाणिवेचें कीर सरलें । परि आणिक एक असें जाहलें ।
जें थितें डहुळलें । मानस माझें ॥ १४ ॥

तेवींचि श्रीकृष्णा हें तुझें । चरित्र कांहीं नेणिजे ।
जरी चित्त पाहसी माझें । येणें मिसें ॥ १५ ॥

नातरि झकवित आहसि आमुतें । कीं तत्त्वचि कथिसी ध्वनितें ।
हे अवगमितां निरूतें । जाणवेना ॥ १६ ॥

म्हणोनि आईके देवा । हा भावार्थ आतां न बोलावा ।
मज विवेक सांगावा । मऱ्हाटाजी ॥ १७ ॥

मी अत्यंत जड असें । परि ऐसाहि निकें परियसें ।
श्रीकृष्णा बोलावें तुवां ऐसें । एकनिष्ठा ॥ १८ ॥

देखें रोगातें जिणावें । औषध तरी द्यावें ।
परि अतिरुच्य होआवें । मधुर जैसें ॥ १९ ॥

जैसें सकळार्थभरित । तत्त्वतां सांगावें उचित ।
परि बोधे माझें चित्त । जयापरि ॥ २० ॥

देवा तुजऐसा निजगुरु । आजि आर्तिधणि कां न करूं ।
येथ भीड कवणाची धरूं । तूं माय आमुचि ॥ २१ ॥

हां गा कामधेनूचें दुभतें । तें दैवें जालें आपैतें ।
तरी कामनेचि कां तेथें । वाणि कीजे ॥ २२ ॥

जरी चिंतामणी हातीं चढे । तरी वांछेचें कवण सांकडें ।
कां आपुलेंनि सुरवाडें । ईच्छावें ना ॥ २३ ॥
देखें अमृतसिंधूतें ठाकावें । मग ताहाना जरि फुटावें ।
तरी साहस कां करावें । मागील तें ॥ २४ ॥
तैसा जन्मांतरीं बहुतीं । उपासितां श्रीकमळापति ।
तों तूं दैवें आजि हातीं । जाहलासी जरी ॥ २५ ॥
तरी आपलेया स्वईच्छा । कां न मगावेसी परेशा ।
देवा सुकाळ हा मानसा । पाहिला असे ॥ २६ ॥
देखें सकळार्थिचें जियालें । आजि पुण्य यशासि आलें ।
हे मनोरथ जाहले । विजयी माझे ॥ २७ ॥
जी जी परममंगळधामा । देवदेवोत्तमा ।
तूं स्वाधीन आजि आम्हां । म्हणउनियां ॥ २८ ॥
जैसें मातेच्या ठायीं । अपत्या अनवसरू नाहीं ।
स्तना लागोन पाहीं । जयापरी ॥ २९ ॥
तैसें देवा तूंतें । पुसिजत असें आवडतें ।
आपुलेनि आर्तें । कृपानिधी ॥ ३० ॥
तरी परत्रिकीं हित । आणि आचरितां उचित ।
तें सांगे एक निश्चित । पार्थ म्हणे ॥ ३१ ॥

तूंचि–तुवाचि. म्हणो आघवें–म्हणो पां आघवें. नेणतीं = अजाण, नेणते. संपलें म्हणो आघवें विवेकाचें = (विवेक = टाकी, सारासार विचार, वाटाघाट.) विवेकासंबंधीं आतां प्रश्नच उरला नाहीं म्हणायचा (६). जन्हि–जरी. अपभ्रंश = भ्रम; संस्कृताहून कनिष्ठ भाषा; खालीं पडणें जें. पुरला आम्हां धिंवसा आत्मबोधाचा (धिंवसा = आवड, हौस) = आत्म्यासंबंधींचा बोध–उपदेश, आत्मज्ञानविचार–ब्रह्मज्ञानासंबंधीं; बुद्धि जागृतीची हौस पुरती झाली म्हणायची. उपदेश = सल्ला, शिकवण (७). आपण–आपणचि. सांगें = सांगै. वारूनि जाये = दूर करून गेला तर मग–रोगिया कैसेनि जिये = (जिवंत राहणारा; पुन्हा जीविताचा होणारा) आजारी का रोगी तो कसा जगणार का बरा होणार! (८). सुईजे–सुइजे = लावावें. आव्हांटा–अव्हांटा = आडवाटेस. माजवणें–माजवण = अमली पदार्थ. कर्मठा (कर्मशूर, कर्मठ)–मर्कटा. तैसा उपदेश हा गोमटा वोडवला (आम्हांपुढें झाला, प्राप्त झाला) आम्हां = आतां पाहावें तों हा उपदेश–ही शिकवण म्हणजे चांगलीच कीं, एक शिकवण आम्हाला मिळाली जें का कर्मठास–कर्मठ मनुष्यास–कर्मासंबंधींचें जें आचरण तेथें एक मादक पदार्थच देणें जें, तें त्यास तेथेंच रोंवून बसवील ना–अथवा [मर्क, मर्कट, मर्कटक (मर्कर = कोळी, किडा)] चंचल अशा माकडास का वानरासच एक अमली पदार्थ दिल्याप्रमाणें होईल कीं (९). आधींचि मी कांहीं नेणें = अगोदरच मी कांहीं–मुळींच–जाणत नाहीं. वरि येणें मोहें कवळिलें = आणिकही वर मी मोहभ्रांतीनें ग्रस्त झालों आहे–ग्रासलों आहे–घेरलों आहे. विवेक पूसिला तुज = म्हणून तुम्हांला विवेक (टाकी, विचार, नित्यानित्य विवेक) विचारला–पुसिला (१०). तंव तुझी एकेक–एकएकी–नवाई–येथें पाहावें तों तुमचें एक एक नवलाचें–मौजेचें असें–नवीन प्रकारचें, नवीनतेचें–अपूर्वपण नव्हाळीचें बोलणें होणें तें. येथ–एथ. उपदेशामाजी गावाई–गोवाई (गुंतागुत, गुंतवणूक) अनुसरलेया–अनुसरलिया. कायी–काई. ऐसें कीजे = मागून येत असलेल्या शरणागताला असें करावें काय; कसें वागावें तें असें करून ठेविलें आहे हें बरें काय? (११)

म्हणें–म्हणे. आम्हीं तनुमनजीवें = शरीरानें, मनानें व जीवानें. तुम्हिया बोला वोठंगावें = तुमच्या बोलण्यास आश्रयास घ्यावें. आणि तुंवाचि ऐसें करावें = वर तुम्हींच जर असें नवनवीन प्रकार पुढें घेऊन बोलणें करावें. तरी सरलें म्हणें = तर मग विवेकाचा विषय पूर्णपणें संपलाच म्हणावा (१२). निकें = लहानपण, घोटाळा घालून अडविणें जें तें म्हणजे अशा तऱ्हेचें तुमचें बोध करणें, उपदेश करणें तें; त्यानें तर आम्हांस चांगलेंच कीं अडविलें आहे हें खरेंच! येथ–एथ–ज्ञानाची आशंका (भीति)–आस (इच्छा) कायसी = येथें आतां ज्ञानासंबंधींची जी आशा ती कसची न् काय, असें होऊन गेलें आहे. आशंका–आशंकितं = भीति, अविश्वास. आस् = स्मरण, रण, दुःख, खेद, आक्षेप. आसः = स्थान, बैठक, धनुष्य, शरीराचा खालचा भाग (१३). एक–येक. जालें–जाहलें. जे (मूळचें प्रेमाचें असलेलें तें) थितें डहुळलें मानस माझें = स्वस्थ, स्थिर असलेलें माझें मानस–मन–तें (डहुळलें) गडबडलें आहे, घुसळलें गेलें आहे (१४). जरी (परि) मिसें–मिषें (चरित्राचें जाणणें तें ह्या निमित्तानें तरी होईल)–तुझें चरित्र (करणें, पाळणें, वर्तन, स्वभाव, चरित्र, इतिहास, कर्तव्य, सदाचरण) कांहीं नेणिजे = तुमचें चरित्र कांहीं जाणवत नाहीं, चित्त (जाणलेलें, लक्ष, विचार, कल्पना, हेतु, मन, ज्ञान, बुद्धि, काळीज, मनाची स्मृतिरूप वृत्ति) पाहसी माझें येणें मिसें (निमित्तानें) = जरी का माझें मन ह्या निमित्तानें तपासीत–पाहत–देखत आहेस (१५).

नातरि–ना तरी. झकवित आहसि आमुतें–झकवीत (चकविणें, चुकविणें, फसविणें) आहसि मातें = अथवा मजला–आम्हांला चकवीत आहेस कीं–का तर तत्त्वच तें ब्रह्मस्वरूप असें गूढार्थानें बोलिलेंस कीं–बोलत आहेस कीं–यामुळें हें अनुमान करतां करतां निश्चित असें खरें तें मुळींच जाणिवेंतच येईना! कीं तत्त्वचि (ब्रह्मस्वरूप) कथिसी ध्वनितें (गूढार्थास, गूढार्थानें)–कीं तत्त्वचि कथिसी ध्वनितें. हे अवगमितां = अनुमान करतां. निरुतें = खरें तें–निश्चित तें जाणवेना (१६). आईके–आइके. भावार्थ = तात्पर्य, सार, तत्त्व. भाव शबलत्व = मनोवृत्तींचें मिश्रण. मऱ्हाटा (स्पष्ट, प्राकृत) विवेक = टाकी, सारासार विचार (१७). मी अत्यंत जड असें = मी तर अतिशय मंदमतीचा जड असा आहे. परि ऐसाहि निकें परियसें–परियेसें = पण असाहि कें चांगलें हितकर तें ऐकोन. श्रीकृष्णा बोलावें तुवां ऐसें (तैसें) = तसें तुम्हीं श्रीकृष्णा बोलावें. एकनिष्ठा–एक-निष्ठ = निश्चित एकच; निष्ठेला एकच योग्य असें (१८). देखें रोगातें जिणावें = असें पाहा कीं जर का रोग जिंकणें आहे तर. औषध तरी द्यावें = औषध हें केव्हांहि द्यावेंच द्यावें. परि अति रुच्य होआवें = पण तें अति रुचकर, स्वादिष्ट असें असावें. मधुर जैसें = जसें का मधुर मधुर असें मधुरच कीं (१९). जैसें (तैसें) सकळार्थ-भरित = तसें सकळ तत्त्वभरित असें. तत्त्वतां सांगावें उचित (योग्य) = तत्त्वदृष्ट्या = सत्यतेनें ब्रह्मच कीं तें, परमात्माच होऊन यावें असें = योग्य तें सांगावें (तत्त्वज्ञान = ब्रह्मज्ञान, यथार्थज्ञान). परि बोधे (समज घेईल) माझें चित्त (लक्ष, मन, बुद्धि) = ज्या प्रकारानेंच मुळीं माझें मन–अंतःकरण–तें समज घेईल. जयापरि = ज्यायोगेंकरून (२०). देवा तुजऐसा निजगुरु = तुम्हांसारखा देवा नित्यब्रह्मतेचा असा निजानंद गुरूच कीं–आजि आर्तिधणि (इच्छेची तृप्ति) कां न करूं = मिळाल्यावर मग इच्छेचि तृप्ति कां बरें नच करून घेऊं ती. येथ भीड (मर्यादा) कवणाचि धरूं = आतां येथें भीड–मर्यादा ती कुणाची धरावी अहो! तूं माय आमुचि = तुम्हीं तर आमुची–वत्सास गाय तशी अर्भकास मज–मायच कीं आहांत ना! (२१). हां गा कामधेनूचें दुभतें (दूधदुभतें, गोरस वगैरे) = सर्वेच्छा पुरविणारी कामधेनु जी तिचें दूधदुभतें तें. तें दैवें जालें–जाहालें. आपैतें–अपैती (प्राप्त) = दैवेंकरून तें प्राप्त झालें आहे. आतां तरी कामनेची का तेथें = कामतः कामना–कामेच्छेनें, जाणूनबुजून, स्वैरपणें–इच्छा करणें जें. वाणि (कमतरता) कीजे = (कमतरता ती कां करावी) = जें कांहीं पाहिजे असेल तें मागून घ्यावें; जी कांहीं इच्छा असेल ती पूर्ण करून घ्यावी ना! (२२).

जरी चिंतामणी हातिं (हाता) चढे = इच्छिलेलें देणारा कल्पित मणि–गणपति जर प्रसन्न झाला, हातात आला, हातचा झाला, हातावरच येऊन बसला. वांछेचें कवण सांकडें (संकट) = तर मग तेथें इच्छेचें संकट तें

कसचें, जी कांहीं इच्छा करावी ती तावडतोब पुरती होणारीच कीं. कां आपुलेंनि सुरवाडें (सुख इच्छेनें आवडणारें इच्छावें; आपल्याच मुळिं आवडीचें तें इच्छिणें होणारें) (२३). देखें अमृत सिंधूतें टाकावें (पावावें) = अहो असें पाहा कीं, अमृताचा एक सिंधूच कीं पावला आहे तेथें आतां. मग ताहाना–ताहान जरि फुठावें = तहानेनें व्याकुळ होऊन जें फुटणें, तडफडणें–तें कां बरें? तरी साहस (सायास) कां करावें मागील ते = व असें जर मग तें मागीलचें तें अमृत प्राप्त करून घेण्याचे ते सायास, कष्ट, श्रम ते व्यर्थ केले होत ना! ते कां बरें तसें करण्याचें केले व्हावेत! जर श्रम झालेत तर तहान भागवावीच! (२४). तैसा जन्मांतरीं बहुतीं = जन्मजन्मांतरी–अनेक जन्मीं (परलोकीं)–जे जन्म बहुत असे झालेले–तेव्हां श्रीकमळापति उपासिला–सेविला. उपासितां श्रीकमळापति–सेविलेला, पूजिलेला, अभ्यासिलेला, चिंतिलेला–तो तुम्हीं आज हातींचे–आश्रयाचे–झालांत; किरणच ते देवतेचे मदतनीस झाले. तो तूं दैवें आजि हातीं जाहलासी–जाहालासि –जरी (२५). तरी आपलेया स्वईच्छा–सवेसा = तरी आपल्या स्वइच्छेनेंच कीं. कां न मगावेसि–मागावासि परेशा. परशं = परीस, तुम्हीं हे परेश, विष्णु–दुसरा, निराळा, परमात्मा. देवा सुकाळ (= समृद्धि) हा मानसा पाहिला उदयाचा झाला) असे (२६).

देखें सकाळार्थिचें जियालें = सकळ इच्छांचें साफल्यच कीं हें जें जन्मलेलें जीवित आजि–आजी पुण्य यशासि आलें = आज पुण्य सफळ झालें–यश पाहातें झालें–फळरूप झालें आहे. हे मनोरथ जाहले–जाहाले = माझे मनोरथ–इच्छा–इष्टवस्तु प्राप्तीसाठीं म्हटले आहेत. विजयी माझे = विजयी कीं ते सिद्धीला गेले आहेत–ते जयशाली झाले आहेत. मनोरथ–दोहदम्, इच्छा, कांक्षा, स्पृहा, ईहा, तृट्, वाञ्छा, लिप्सा, मनोरथ, कामः, अभिलाषः, तर्षः इति १२ स्पृहायाः। पुण्य = धर्मम्, पुण्यम्, श्रेयः, सुकृतम्, वृषः, इति ५ सुकृतस्य। चारु सुंदरम्। अपि शब्दात् सुकृत धर्मयो पुण्यम्॥ नुसतें सुकृतच नव्हें तर धर्मसुद्धां कीं पुण्याप्रत आला आहे. [सुकृती, पुण्यवान्, धन्यः इति ३ भाग्यसंपन्नस्य। पुण्य = पुण्यजनेश्वर = कुबेर, त्र्यंबकसखा। मनुष्यधर्मः। पुच्छ = पुच्छं, लूमम्, लाङ्गूलम् इति पुच्छस्य।] (२७). जी जी परममंगळधामा = परम आत्यंतिक कल्याणाचें निधान–धाम देवयोनी जी अहो हे भगवन्–गृहादीनि चत्वारि धाम शब्द वाच्यानि = गृह, देह, त्विट्, प्रभावा (प्रभावः = तेज, सामर्थ्य, पराक्रम, राजतेज, निग्रहानुग्रह, शक्ति, शांति, उद्भव) धामानि त्विष् = उजेड, तेज, कांति, सौंदर्य, सत्ता. सकळ देवदेवोत्तमा = सर्वच्या सर्व देवाच्याहि देवांमधीलचे उत्तम असे श्रीभगवान् श्रीकृष्ण. तूं स्वाधीन आजि आम्हां = तू–तुम्हीं, आजि आम्हांस स्वाधीन = स्ववश, स्वतंत्र, अवश्यभावी (स्व = सगोत्र, बांधव, ज्ञातिबंधु, स्वः, स्वजनः इति सगोत्रस्य।)–स्वाधीनतेचे असे झाले आहांत–कांहींही झालें तरी पुढें होणारे ब्रह्मनिष्ठ ज्ञानी (२८).

जैसें मातेच्या ठायीं = ज्याप्रमाणें आईच्या ठिकाणीं लहान अर्भक–जें अपत्य (अपत्य त्यास, स्तनासाठीं, दुग्धपानासाठीं कांहीं वेळ का अवेळ असें नाहींच–तें केव्हांही स्तन दुग्धपान हें मागणारें असेंच असतें ना!) स्तना–स्तन्या (स्तन्य = दुग्धपान) स्तन् = शब्द करणें. स्तन = थान. उत्तानशया। डिंभा। स्तनपा। स्तनधनप। स्तनंधय = अंगावर पिणारें मूल. स्तन्य = दूध. स्तनयित्नु = मेघगर्जना; मेघ; वीज (२९). तैसें दैवा तूंतें = तसें देवा तुम्हांस मजला आवडणारें असें जें कांहीं तें. पुसिजत असें–पुसिजतसे. आवडतें–आवडे तें–त्यासाठींची इच्छा सफळ व्हावी म्हणून हे कृपानिधी = दयेच्या निधी, सागरा, दयेचा ठेवाच एक त्या तुम्हांस पुसत आहे. आपुलेनि आर्तें = अर्ति–आर्तें–इच्छा–इच्छेनें सफळ व्हावी म्हणून (३०). तरी (परत्रिकी–परलोकीं) परत्रिकीं हित = करितां परलोकीं हिताचें करणारें. कल्याणच एक पाहणारें. आणि आचरितां–आचरितां तरी–उचित (योग्य) व आचरलें असतां तें–कीं योग्य असें तें सांगें एक निश्चित (नक्की, खरें) विहित–स्वाभाविक–स्तुत्य असें जें कांहीं तें एक निश्चिततेचें–नक्की–पार्थ म्हणें, खरें असें सांगा–असें पार्थानें म्हटलें (३१).

देवा तुम्हीं असें बोलावें जर, तर मग आम्हीं–ज्या आम्हांवर नेणतेंपणच परिणाम करीत असलेलें, त्या आम्हीं काय करावें बरें?–येथें आतां विवेकाचा बाजारच उठला म्हणायचा कीं!–विवेक हा हटाचा असा नव्हेंच असा होत आहे! (६)

अहो, असा जर आपला उपदेश–तर मग भ्रम तो कांहीं दुसरा तिसरा नव्हें! हा भ्रमच एक घोटाळा घालणारा!! आमची आत्मबोधाची हौस, आवड, इच्छा इथेंच पुरती, संपली म्हणायची कीं! (७)

वैद्य पथ्यच वारून दूर करत चालला–मग आपण स्वतःच तें विषच कीं घातल्याप्रमाणें–तर मग रोगी कसा जगेल तें सांगावें मजला कीं! (८)

आंधळ्याला आडवाटेला लावावें, अथवा कर्मठासच अमली पदार्थ परिणाम करणारा व्हावा; तसा हा उपदेश चांगलाच कीं आम्हांस मिळाला म्हणायचा! (९)

मी अगोदरच मुळीं कांहीं नेणता असा–वर ह्या मोहानें ग्रासिला–या कारणास्तव हे श्रीकृष्णा, तुम्हांस नित्यानित्य विवेक–विचार पुसिला–विचारला तो ...... (१०)

तो तुमची एकेक नवाई, तुमचा एक एक प्रकार तो नवीन असा; व त्यामुळें उपदेशामध्यें गुंतागुंती–गोवाई–गुंतवणुकीमुळें कसें वागावें तें? (११)

कायावाचामनेंकरून तुमच्या बोलास–उपदेशास अनुसरावें, आश्चर्यांचें करावें, तर मग जगणें संपलेंच म्हणावयाचें! (१२)

आतां अशा तऱ्हेचा उपदेश जर–तर मग आमचा आम्हांस घोटाळाच करीत आहांत! इथें ज्ञानाची इच्छा–आस ती काय न् कसची बरें पुरती होणारी अशी! (१३)

तुमच्याकडून निश्चयात्मक विचार कळण्याची गोष्ट संपली; पण एवढ्यानेंच झालें नाहीं–तर एका विचारावर असलेलें माझें मन–चित्त तें उलटें निभ्रांत पडलें आहे (मन ढवळलें, हाललें गेलें). (१४)

तसेंच हे श्रीकृष्णा, तुमचें चरित्र कांहींच जाणलें जात नाहीं!–जरी का ह्या निमित्तानें माझें चित्तच तुम्हीं तपासून पाहत आहांत! (१५)

अथवा आम्हांस झकवीतच आहांत–जें का गूढ भाषेनें ध्वनीस तत्त्वच म्हणत आहांत–असें हें खरें पाहिलें असतां जाणवलें जाईना! (१६)

म्हणून देवा! ऐकावें कीं–असा हा संदिग्ध विचार–हेतु आतां नच बोलावा; पण मला सोपा असा नेहमींच्या बोलीचा–चालू भाषेप्रमाणें–मऱ्हाठा जी विवेक सांगावा अहो! (मरहट्ट, मरहट्ठ, मऱ्हाट, मऱ्हाठा, मऱ्हाठी–महाराष्ट्र=मराठी). (१७)

मी अत्यंत जडबुद्धीचा असाही, पण ऐकत आहे! चांगुलपणानें तसें तुम्हीं ठामपणाचें बोलावें. (१८)

देवा, रोगास जिंकण्याचें तर औषध द्यावें–पण तें अति रुचकर, मधुर असें असावें. (१९)

सर्व अर्थहेतूनें युक्त असें तत्त्व उचित तें सांगावें; ज्यायोगें का माझें चित्त पण बोधानें बोधलें असें होईल कीं! (२०)

देवा, तुम्हां ऐसा गुरु–निजनित्य ब्रह्म जें तेंच कीं गुरुपदास आलेलें जसें!–आज मी कां बरें माझ्या आर्तअवस्थेस धन्यता देऊं नये! तें.. तें तर माझ्या इच्छेच्या तृप्तीसाठीं करावेंच तें! इथें भीड कुणाची व काय कसची ती! अहो, तुम्हीं तर आमुची मायच कीं! (२१)

अहो! कामधेनूचें दूधदुभतें दैवयोगानें हातीं आलें-हातचें झालें, प्राप्त झालें. येथें आतां मग कामना-इच्छा पुरती करून घेण्याची वाट कशास पाहण्याची ती! उणीवेची इच्छा तृप्त करून घेण्याचें तें तसें कां बरें व्हावें-करावें बरें तें! (२२)

सर्व इच्छा, कामना तृप्त करणारा मणी जर हातीं आला तो-तर गणपती देवच जसा इच्छेचें करणारा असा; येथें मग आतां वाञ्छा, इच्छा, कामना तृप्त व्हावी-करून घ्यावी-तेथें संकट तें कसचें! आपल्यास आवडतें असें, आवडेल तसें तें कां नच इच्छावें, पुरतें करून घ्यावें तें? (२३)

अहो, अमृताचा सिंधु-सागरास पोहोंचला व मग तहानेनें कां बरें फुटावें, तडपावें तें तरी! मग ही कामना पुरती व्हावी म्हणून केलेले सायास-जे दीर्घ प्रयत्न-ते कशास बरें केलेले? (२४)

अनेक जन्मजन्मांतरी श्रीकमळापति, श्रीलक्ष्मीपतीची उपासना-सेवा केलेली, ती; तो देवच एक लक्ष्मीकांत आज दैवयोगें माझे हातींचा झाला आहेस, जरी कीं अहो .... (२५)

तर मग मी आपल्या स्वइच्छेनें कां नच मागावें बरें? तुम्हीं आंगचे माझ्या व्हावेत, असा मी-नच मागावें तें अहो देवा! मानसाचें-माझ्या मनानें-तर आज भाग्याचा दिवस पाहिला-होत आहे. आज माझ्या मनाच्या भाग्य उदयाचा दिवस उगवला आहे अहो कीं .... (२६)

अहो देवा, सकल इच्छांचें साफल्य आज आपणच कीं येथचे झाल्यानें, माझें जिणें-जीवित-सफळ होऊन तें 'यशवंत हो' अशा भागीचें असें झालें आहे. अहो, माझे मनोरथ सिद्धीला गेले आहेतच कीं! (२७)

अहो, जी जी-आत्यंतिक कल्याणाचें निधान-परममंगलधामा-सकळ देवांच्याहि उत्तम देवा-तुम्हीं आज स्वाधीनच झालेले आहांत म्हणून कीं .... (२८)

अहो, तेथें काळ वेळ कसचा! त्वरिततांच एक परिणामकारी! अहो! मातेनें अपत्य स्तनास लावणें तेथें स्तनपानाला वेळ अवेळ अशी केव्हांच नाहीं ज्याप्रमाणें, तसें-अहो! देवा! तुम्हांस आवडतें असें माझें साफल्य जीविताचें तें विचारीत आहे- (२९)

अहो! कृपानिधी! मी आपल्यालाच कीं-परलोकमार्गाला साह्यकर असें कांहीं आपणाला पुसिजत, जीविताचें विचारीत आहे. अहो, करुणेचे सागर त्या तुम्हीं-तुम्हां-अहो! (३०)

करितां परलोकसंबंधीं हितकर व आचरण्यास योग्य (उचित) तें निश्चित सांगावें, असें पार्थ म्हणतो आहे. (३१)

**श्रीभगवानुवाच :**

**लोकेऽस्मिन्द्विविधा निष्ठा पुरा प्रोक्ता मयानघ ।**
**ज्ञानयोगेन सांख्यानां कर्मयोगेण योगिनाम् ॥ ३ ॥**

[अनघ = हे निष्पापा! अस्मिन् लोके = ह्या लोकीं-निष्ठा द्विविधा = द्वि = दोन (द्विदेह, द्विधातु = गणपति. विध् = प्रकार, वेध करणें, समृद्धि.) निष्ठा = दृढ भक्ति, श्रद्धा. मया पुरा प्रोक्ता = पूर्वीं मीं सांगितल्या आहेत. सांख्यानां ज्ञानयोगेन (प्रोक्ता निष्ठा) सांख्याची ती निष्ठा ज्ञानयोगानेंच सिद्ध होणारी. (द्वध = दुहेरी-दोन प्रकारचें द्वैत, दोन भाग, भेद, विरोध, संशय, दुही, वैर, बलिष्ठाशीं संधि व दुर्बलाशीं विग्रह, प्रतिवाद. निष्ठा = गति, पाया, स्थिरता, दृढ भक्ति, श्रद्धा, वर्तन, मार्ग, कौशल्य, कार्यसिद्धि, सिद्धान्त, पूर्णता, उत्कर्ष, याचना.]

**अन्वय :** श्रीभगवान् उवाच । अनघ, अस्मिन् लोके । मया द्विविधा निष्ठा । पुरा प्रोक्ता । सांख्यानां । ज्ञानयोगेन (एकविध निष्ठा) । योगिनाम् कर्मयोगेण (एकविध निष्ठा) ॥

**अर्थ :** श्री भगवान् म्हणाले–ह्या लोकीं दोन निष्ठा पूर्वी म्यां सांगितल्या आहेत. ज्ञानयोगानें सांख्याची ती पूर्तता, निष्ठा व कर्मयोग्याची का योग्याची ती कर्मयोगानें निष्ठा, पूर्तता होणारी (२).

या बोला श्रीअच्युतु । म्हणत असे विस्मितु ।
अर्जुना हा ध्वनितु । अभिप्राय ॥ ३२ ॥

जे बुद्धियोग सांगतां । सांख्यमत (संच्छा) संस्था ।
प्रकटली स्वभावतां । प्रसंगें आम्हीं ॥ ३३ ॥

तो उद्देश नेणसीची । म्हणउनि तूं क्षोभलासि वायांचि ।
तरी आतां जाणै मीचि । उक्त दोन्ही ॥ ३४ ॥

अवधारीं वीरश्रेष्ठा । ये लोकीं या दोन्ही निष्ठा ।
मजचिपासून प्रगटा । अनादिसिद्ध ॥ ३५ ॥

एक ज्ञानयोग म्हणिजे । तो सांख्यीं अनुष्ठिजे ।
जेथ वोळखीसवें पाविजे । तद्रूपता ॥ ३६ ॥

एक कर्मयोग जाण । जेथ साधक जन निपुण ।
होऊनियां निर्वाण । पावती वेळें ॥ ३७ ॥

हे मार्ग तर्‍हीं दोन्ही । परि एकवटती निदानीं ।
जैसी सिद्धसाध्य भोजनीं । तृप्ति एकी ॥ ३८ ॥

कीं पूर्वापर सरिता । भिन्ना दिसती वाहतां ।
मग सिंधुमिळणीं ऐक्यता । पावति सेखीं ॥ ३९ ॥

तैसीं दोन्ही हीं मतें । सुचित एका कारणातें ।
परि उपास्ति ते योग्यते । आधीन असे ॥ ४० ॥

देखे उत्प्लवनासरिसा । पक्षी फळासि झोंबे जैसा ।
सांगे नर केविं तैसा । वेगां पावे ॥ ४१ ॥

तो हळुहळु ढाळेंढाळें । केतुलेनि एके वेळे ।
मार्गाचेनि बळें । निश्चित ठाकी ॥ ४२ ॥

तैसें देख पां विहंगमातें । अधिष्ठूनि ज्ञानातें ।
सांख्य सद्य मोक्षातें । आकळिती ॥ ४३ ॥

परि योगिये कर्माधारें । विहितेंचि निजाचारें ।
पूर्णता अवसरें । पावते होती ॥ ४४ ॥

श्रीअच्युतु–अच्युत । विस्मितु–विस्मित = आश्चर्ययुक्त–(गर्विष्ठ)–विस्मित होऊन. अभिप्राय–अभिप्रावो. ध्वनितु–ध्वनित = ध्वनियुक्त गर्जना (व्यंगार्थ = सुचविलेला, व्यंजनेनें जाणण्याचा); गर्भितार्थ (व्यंजक = सूचक, हावभाव, चिन्ह, दर्शक). अभिप्राय = हेतु, इच्छा, आशय, उल्लेख, संबंध (३२). सांख्यमत संच्छा–सांख्यमत संस्था. प्रकटली–प्रकटिली. सांगतां = कार्यसिद्धि सांग = अंगासहित पूर्ण. सांगतिक = योग्य, पाहुणा, खूषमस्कऱ्या. सांगत्य = संगति, सहवास (सांघतिक = घातुक)–ईश्वरार्पण बुद्धीनें कर्म करण्याचा मार्ग. संस्था = मार्ग. मत = पंथ, अभिप्राय, उद्देश, ज्ञान. बुद्धि = (वे.)

निश्चयरूप अंतःकरणवृत्ति, प्रकृति, समजूत, जाणीव, हेतु, शुद्धीवर येणें, कल्पना, विचारतरंग. बुद्धियोग = बुद्धि = ज्ञान व योग = कर्मयोग ह्या दोहोनीं = ज्ञानानें-ज्ञानयोगानें व कर्मयोगानें-वर जी कांहीं सांख्यमत संस्था = आत्मनात्म विचार, दिशा प्रकट अशी झाली तेथें आम्ही तर सहज स्वभावेंकरूनच कीं-प्रसंगेन. प्रसंग = निष्ठा, अनुराग, आसक्ति, संभव, समय, गाणें-बजावणें, मन आसक्त करणाऱ्या गोष्टी (मीमांसक); मुख्य कार्य करीत असतां सहज अन्य कार्य साधणें-होणें जें-(व्या.) प्राप्ति (प्रसंगेन प्रसंगात्)-सहजीं; जाता जातां. प्रसंख्यान् = तपस्विभेद-वेळेला जरूर तेवढें घेणारा-ध्यान, चिंतन, कीर्ति, गणना, द्रव्याची रक्कम फेडणें-फेड. प्रसंगिन् = ताबेदार, आसक्त, आसक्त करणारा; प्रासंगिक. सांख्यशास्त्र = सर्व जग परमाणूपासून झालें असें मत. यांत फक्त पंचवीस तत्त्वें मानतात. (तत्त्वज्ञान) महाभूतें ५, अहंकार १, बुद्धि १, अव्यक्त १, मन १, दश इंद्रियें १०, पंचविषय ५ = २४-पंचविसावा तो पुरुष. बुद्धियोगाची सांगता तीच ही सांख्यमत संस्था प्रगटली-तेथें स्वभावतः आम्हीच कीं आम्ही असें झालों (३३).

म्हणउनि-म्हणोनि तूं क्षोभलासि-(संक्षोभ = मोठा गोंधळ, भय, गर्व, ताठा व क्षोभामुळें-क्षुभ = कांपणें, हालणें, क्षुब्ध होणें. खळबळ होणें, गोंधळ होणें.)-शिणलासि. जाणै-जाण. उद्देश नेणसीची = तेथीलचा उद्देश, अट, करार, नेमून देणें, हेतु, प्रदेश, जागा, बोलणें, शोध, दाखविणें, दृष्टान्त उल्लेख जाणेनास-जाणतच नाहींस कीं अहो. शिणलासि वायांचि = व्यर्थच श्रमलास-शिणलास. आतां जाण कीं मीचि उक्त दोन्ही = दोन्ही-बुद्धियोग व ज्ञानयोग हे मार्ग सुचविलेले ते दोन्ही मार्ग-मीच म्हणावा. उक्त मीचि-सूचित तेथें (भाषण, वाक्य) (३४). या दोन्ही निष्ठा = ह्या दोन्ही निष्ठा-मार्ग-संप्रदाय = मोक्षपर होणें जें, नियमस्थिति. अनादिसिद्ध-अनादिसिद्धा = नित्यसिद्ध. अनादि = आरंभ उत्पत्ति इत्यादिरहित ईश्वर. सिद्ध = संतुष्ट, तज्ज्ञ, नित्य. सिद्ध-सिद्धा. सिद्ध = उपदेव विशेष (३५). एक-येक. ज्ञानयोग म्हणिजे = ज्ञानरूप मोक्षसाधन = माहित असणें, जाणतेंपण, जाणीव, तत्त्व कळणें. तो-जो. सांख्यीं-सांख्य. अनुष्ठिजे = सांख्य म्हणजे ज्ञात्यांनीं आचरावा-अनुष्ठावा. वोळखीसवें-ओळखीसवें (३६).

एक-येक. कर्मयोग = धर्मकृत्य करणें; दीर्घ प्रयत्न. (कर्मकांड = यज्ञासंबंधींचा वेदभाग; कर्मसमूह.) साधक जन = मुमुक्षु. निपुण = कुशल. (ह्या कर्ममार्गानें साधक तयार होत होत अखेर मोक्षधाम पावतात -हा सावकाशीचा पण सर्वसाध्य असा पंथ आहे.) निर्वाण = मोक्ष. पावती वेळें = चित्तशुद्धीकाळीं, ऐन मोक्षाच्या समयीं. (समय = शपथाचा वालसिद्धान्तसंवित्सुसमयः व्यसनानि यूतदीनि। (३७). दोन्ही-दोनी. एकवटती = उठावती-शेवटीं एकत्र होतात; शेवटीं दोहोंना गति एकच. निदानीं = (निदान = मूळ कारण, शेवट, शुद्धता, शेवट). सिद्ध = तयार असलेल्या (अन्नाच्या)-साध्य = तयार करण्याच्या (अन्नाच्या). भोजनीं = भोजनस्य = जग्धिः, भोजनम्, जेमनं, लेहः, आहारः, निघसः, न्यादः इति। तृप्ति = सौहित्यम्, तर्पणम्, तृप्तिः इति ३ तृप्तेः। कीं-कां. पूर्वापर सरिता = (पूर्वापर = साधकबाधक विचार, पूर्व दिशेस वाहणारी व पश्चिम दिशेस वाहणारी नदी. अपरांत = पश्चिमेकडचा, कोंकण प्रांत किंवा तेथीलचे राजे). भिन्ना-भिन्न = निराळे, रागावलेले, फूल. भिन्न अर्थ = उघड, स्पष्ट. वाहतां-वाहातां = प्रवाहानें, प्रवासानें. सिंधु-सिंधू. ऐक्यता = एकी, एकता. सेखीं-शेखी = शेवटीं (३९).

दोन्ही-दोनीही. सूचित-सूचिती = सूच् = चहाडी करणें; प्रगट करणें; सुचविणें; सूचना देणें; कळविणें; माहिती काढणें: एकदम भोंक पाडणें. कारणातें = फळ, साधन, हेतु, मूळतत्त्व, क्रिया, प्रेरणा, प्रमाण. परि-परी. उपास्ति = उपासना, शुश्रूषा, परिचर्या, वरिवस्या. आधीन-अधीन [परस्वाधीन, पराधीन = परतंत्र, पराधीनः, परवान्, नाथवान् इति ४। पराधीनस्य = अधीनः। निघ्नः। आयत्तः। अस्वच्छन्दः। गृह्यकः इति ५। अधीनस्य् = खलपूः। बहुकरः इति २।] (४०). उत्प्लवनासरिसा = भरारीसरिसा, उड्डाणासरिसी एकदम. वेगां पावे-पावे वेगां = (वेग = त्वरा, आवेश, जोर, प्रवाह.) पावतो = येतो, होतो (४१). डाळेंढाळें =

फांदीफांदीनें (४२). विहंगमाते–विहंगममतें = आकाशगामी पक्षी–मत. ज्ञानमार्ग म्हणजे विहंगम मार्ग. कर्म-मार्ग म्हणजे पिपीलिका मार्ग. अधिष्ठूनि–अधिष्ठुनि = ज्ञानाचे ठायीं राहून; आसनाचें करून; ठिकाणचें करून. सद्य (सध्य) = लगेंच, लवकर, आजच्या आज. वर्तमानकाळ. आकळिती = गांठतात, आकळतात (४३). परि–येर. योगिये = कर्मयोगी. कर्माधारें = विहित कर्म करूं. विहितेंचि निजाचारें = योग्य अशा आपल्या आचारानेंच. पूर्णता अवसरे = कांहीं काळानें–वेळीं कीं पूर्णता पावणारे होतात (४४).

हे अर्जुनाचे बोल ऐकून देव विस्मित, चकित झाले; व म्हणूं लागले कीं, अर्जुना! येथें तुला सांगितला तोच हेतु–गर्भितार्थ खरा जाण! (३२)

जें कांहीं बुद्धियोगासंबंधीं सांगतां, सांगतां सांख्यज्ञान, वैराग्ययोगसंस्था ती आपलेपण वागविणारें तें येथें आहांत कीं— (३३)

तो आपलेपणाचा उद्देश, हेतु जाणलास–नेणतेपणच एक तेथें वागवीत आहेस–म्हणून व्यर्थच शिणत आहेस, शिणला आहेस. तरी आतां हीं दोन्हीं तत्त्वें मी जी–उक्त–बोलिलों तेंच जाण. येथें बोलाचें होणें तेंच मी कीं आपण स्वतः (होय, हेंच जाण). (३४)

हे वीरश्रेष्ठा! ह्या लोकीं ह्या दोन्ही निष्ठा–ह्या जगांत ज्ञान आणि कर्म हीं दोन मोक्षसाधनें–मार्ग–मजपासून प्रगटलेले (मीच प्रगटिले)–त्या निष्ठा, ते मार्ग, तीं साधनें, त्या मूळच्या मजप्रमाणें स्वतःसिद्ध होत. (३५)

आत्मप्राप्तीचें ज्ञान हें एक साधन. तो ज्ञानयोग, जो सांख्यीं म्हणजे ज्ञानी लोकांनीं अनुष्ठावा. जेथें स्वरूपओळखी होतांच, निजस्वरूपाची खूण कळतांच तद्रूपता होते; आत्मरूपी मिळणें होतें म्हणजे तन्मयता होते. (३६)

दुसरा कर्मयोग समज. जेथें ईश्वरप्राप्तीकरितां कर्म करणारे (निपुण) प्रवीण होऊन कांहीं थोड्या अवकाशानें (निर्वाण) मोक्ष पावतात. (३७)

हे मार्ग तर दोन आहेत; पण ते शेवटीं दोघांना एकमेकां एकच गति देणारे आहेत. तेथें जीवित-साफल्यच एक पदरांत पडणारें–जसें तृप्तीच एक भेटणारी–भोजन साध्यसिद्ध असें तें झाल्यानें, भोजन झाल्यावरच कीं– (३८)

असें पाहा कीं, पूर्वेस वाहणारी व पश्चिमेस वाहणारी अशा दोन नद्या वाहतांना भिन्न दिसतात; पण त्या जेव्हां सिंधूस मिळतात तेव्हां तेथें तर शेवटीं ऐक्यताच एक कीं! (३९)

त्याप्रमाणें हीं दोन्हीं मतें एक कारणच सुचवितात, संबंधी सूचना देतात; पण तें अहो, देह उपास्तीची ती तृप्ति योग्यतेच्या आधीन असणारी होय. (दोन्ही मार्गांचें साध्य एकच आहे, पण या दोहोंपैकीं कोणत्या मार्गाची उपासना किंवा अभ्यास करावयाचा हें ज्याच्या त्याच्या योग्यतेवर अवलंबून आहे.) (४०)

पक्षी जसा उड्डाणासरिसा फळास झोंबतो तसा–काय केलें असतां तो नर वेगास येईल, येतो, पावेल, पावतो–तो हळुहळू फांदीफांदीनें जाऊन कांहीं एका वेळानें, मार्गाच्या बळावरच कीं निश्चितपणें आपल्या ध्येयास पावतो–पोहोंचतो–उभा होतो. (४१)

तसें जाण कीं, या विहंगम मार्गानें ज्ञानास अधिष्ठून, सांख्यज्ञानी वैराग्यवंत ते मोक्षातें तावडतोब आकळून, घेऊन असतात. (४२)

ज्ञानमार्गाला विहंगम मार्ग व कर्ममार्गाला पिपीलिका मार्ग म्हणतात. ज्ञानी पक्ष्यासारखें उड्डाण करतो व पटकन् लक्ष्याला झोंबतो. म्हणून त्याच्या मार्गाला विहंगम मार्ग म्हणतात. कर्माचा अधिकारी पुरुष

हळुहळू, पिपीलिका म्हणजे मुंगीच्या पाउलानें चालतो म्हणून त्याचा पिपीलिका मार्ग होय. सांख्यज्ञानीसुद्धा सकल मोक्षपद गांठतो. कर्ममार्गी विहित कर्माचरणानें मोक्ष पूर्णतः पावतोच, पण दीर्घकालानें! (४३)

दुसरे योगी कर्माच्या आधारानें आपल्या विहित–निज, नित्य, कर्म-आचारानें कांहीं काळानें पूर्णता पावणारे होतात. (४४)

**न कर्मणामनारम्भान्नैष्कर्म्यं पुरुषोऽश्नुते ।**
**न च संन्यसनादेव सिद्धिं समधिगच्छति ॥ ४ ॥**

[ न कर्मणाम् = नच कर्माच्या (नच आरंभावांचून) अनारंभात् नैष्कर्म्यम् = अन्+आरंभात् = आरंभिल्याशिवाय; आत्म नच करितां. पुरुषोऽश्नुते = पुरुषास प्राप्त होते. संन्यसनात् एव च न सिद्धिं = नुसत्या संन्यासानेंच सिद्धि मुळींच नच मिळणारी. समाधिगम = संयुक्त होणें; जवळ जाणें; एकत्र होणें. ]

**अन्वय :** पुरुषः कर्मणाम् अनारंभात् न नैष्कर्म्यम् अश्नुते। संन्यसनात् एव च सिद्धिम् न समधिगच्छति।

**अर्थ :** कर्म-आरंभच कीं पुरुषास नैष्कर्म्य देणारा होतो. नुसत्या कर्म न करण्यावर-संन्यासानें-सिद्धि भेटत नाहीं (४).

**वांचूनि कर्मारंभा उचित । न करितां सिद्धवत ।**
**कर्महीना निश्चित । होईजेना ॥ ४५ ॥**

**कीं प्राप्तकर्म सांडिजे । येतुलेनि निष्कर्म होईजे ।**
**हें अर्जुना वायां बोलिजे । मूर्खपणें ॥ ४६ ॥**

**सांगे पैल तिरां जावें । ऐसें व्यसन कां जेथ पावे ।**
**तेथें नावेतें त्यजावें । घडे केविं ॥ ४७ ॥**

**ना तरी तृप्ती (ईछिजे) इच्छिजे । तरी कैसेनि पाक न किजे ।**
**कीं (सित्धही) सिद्धही न (शेविजे) सेविजे । केविं सांगे ॥ ४८ ॥**

**जंव निरार्तता नाहीं । तंव व्यापार असे पाहीं ।**
**मग संतुष्टेचा ठाईं । खुंटे सहजें ॥ ४९ ॥**

**म्हणोनि आइकें पार्था । जया नैष्कर्म्यपदीं (आस्छा) आस्था ।**
**तया उचित कर्म सर्वथा । त्याज्य नोहे ॥ ५० ॥**

**आणि आपलिये चाडे । आपादिलें हें भिडें ।**
**कीं त्यजिलें कर्म सांडें । ऐसें आहे ॥ ५१ ॥**

**हें वायांचि सैरा बोलिजे । उकल तरि देखी पाहिजे ।**
**परि त्यजितां कर्म न त्यजे । निभ्रांत मानीं ॥ ५२ ॥**

वांचूनि–वांचोनि. कर्मारंभा–कर्मारंभ. उचित = योग्य. सिद्धवत = सिद्ध = निर्वृत्त, निष्पन्न. वत् = प्रमाणें (सिद्धाप्रमाणें) (४५). कीं–कि. होईजे–होइजे. मूर्खपणें = मूर्ख = अज्ञ, मूढ, यथाजात, मूर्ख, वैधेय, बालिश. अज्ञे मूढ यथाजात वैधेय बालिशः । (४६). पैल तिरां–पैलतीरा. तेथें–तेथ. केविं–केवीं (४७). तृप्ती–तृप्ति. ईछिजे–इच्छिजे. तरी–तरि. कैसेनि–कैसे. किजे–कीजे. कीं–कि. सित्धही–सिद्धहि. शेविजे–सेविजे. केविं–केवीं (४८). पाहीं–पाहि. संतुष्टेचा ठाईं–संतुष्टीच्या ठायीं. खुंटे–कुंठे (४९). पदीं–पदि. आस्छा–

आस्था. आस्था = यत्न, प्रयत्न. आस्थानी = सभा, गोष्ठी, परिषत्. (५०). आपलिये = आपुलालिये. भिर्डे–मांडे. कीं–कि (५१). उकल–उकळ. देखी–देखोनि. मानीं–मानि (५२).

विहित कर्म न करतांच कोणी ज्ञानियाप्रमाणें मलाही शीघ्र मोक्षलाभ होईल असें म्हणेल, तर मात्र त्या कर्महीनाला निश्चयानें तो मोक्ष मिळणार नाहीं. (४५)

वर्णा (श्रम धर्मप्रमाणें)–अवश्य असें प्राप्तकर्म तें सांडिजे व एवढ्यावरच नैष्कर्म्य–कर्म न करणारा निष्कर्मी होईजे, असें हें अर्जुना, व्यर्थच कीं मूर्खपणाचें बोलणें ना! (४६)

भवसागर तरून जावा असें वाटतें तर तेथें (नामस्मरणरूपी) नावेस त्यजावें तें कां? (४७)

अथवा इच्छातृप्ति व्हावी असें वाटत असेल, तर तसा स्वयंपाक कां बरें नच व्हावा–करावा? तसेंच जर स्वयंपाक सिद्ध आहे, तो तरी कां बरें नच सेवन करावा बरें? (४८)

जोंपर्यंत निरिच्छपणा (आर्तता = इच्छा, तिचा प्रभाव ती निरिच्छता) नाहीं तोंपर्यंत कर्म करणें आहेच– तेथें कर्म व्यापारणें होय–असणारच–तें मग संतुष्टतेच्या परिणामानें सहजच कीं बंद पडतें, कुंठतें कीं.. (४९)

हे पार्था! आणि म्हणून ऐक कीं, ज्यास नैष्कर्म्य पदाची इच्छा आहे त्यानें उचित कर्म केलेंच पाहिजे. (५०)

आपल्याच इच्छेनें–कर्माचा स्वीकार व त्याग आपल्या इच्छेवर अवलंबून नसतो–असत नाहीं. तेथें त्यजिलेलें कर्म नाहींसें होतें, सांडतें, सोडलें जातें, बाजूस होतें. कर्मत्याग केव्हांही होत नसून, तें त्यजिलेलें कर्म आपल्या पुरतेपणास येण्याची वाट पाहत असलेलें असतेंच कीं! (५१)

त्यजिलेलें कर्म तें सांडतें, नाहींसें होतें, अहो, असें वायांच बोलावें! उलगडा पाहिजे असल्यास तसें तें देखून–करून पाहावें. जेथें कां त्यजिलेलें कर्म तें त्यजिलें होतें–सांडतें, बाजूस होतें–असें पूर्ण निःसंशय–पूर्ण खात्रीनें जाण! (५२)

**न हि कश्चित्क्षणमपि जातु तिष्ठत्यकर्मकृत्।**
**कार्यते ह्यवशः कर्म सर्वः प्रकृतिजैर्गुणैः॥ ५॥**

[नहि कश्चित् जातु = (जन्मलेला प्राणी. जंतु = लोक, प्राणी, जीवात्मा, कृमि. जातु = एकादे वेळीं निंदा) कदाचित् जातु इति २। कस्मिंश्चित् काले. सार्धम्, साकम्, सत्रा, समम्, सह इत्यादि ५ सहेत्यर्थे। प्रकृतिजैः गुणैः = क्षणभर सुद्धां कांहींना कांहींतरी कर्म केल्याशिवाय असतो. सर्व कर्म अवशः कार्य ते = सर्व कर्म स्वेच्छेनें केलें जातें. अवशः = स्वतंत्र, स्वच्छंद, स्वैर, ताब्यांत न जाणारा, दुबळा, परतंत्र, अपरिहार्य, अजितेंद्रिय.]

**अन्वय :** कश्चित् जातु न हि क्षणम् अपि अकर्मकृत् तिष्ठति। अवशः हि प्रकृतिजैः गुणैः सर्वं कर्म कार्यते।

**अर्थ :** कारण कोणीही प्राणी एक क्षणभर देखील कर्मावांचून कधींच राहूं शकत नाहीं. प्रकृतीच्या गुणांनीं सर्व प्राणी परतंत्र असल्यामुळें ते गुण त्याच्याकडून कर्म करवितात (५).

**जंव प्रकृतीचें अधिष्ठान। तंव सांडी मांडी हें अज्ञान।**
**जे चेष्टा ते गुणाधीन। आपैसि असे॥ ५३॥**

**देखें विहित कर्म जेतुलें। तें सगळें जऱ्ही वोसंडिलें।**
**तरी स्वभाव काय निमाले। इंद्रियांचें॥ ५४॥**

सांगें श्रवणीं आईकावें ठेलें । कीं नेत्राचें तेज गेलें ।
हें नासारंध्र बुझालें । परिमळ नेघे ॥ ५५ ॥

ना तरी प्राणापानगती । कां निर्विकल्प जालीसे मती ।
कीं क्षुधातृषादि आर्ति । खुंटलिया ॥ ५६ ॥

हे स्वप्नावबोध ठेले । किं चरण चालों विसरले ।
हें असो काई निमाले । जन्ममृत्यु ॥ ५७ ॥

हें न ठाकेचि जऱ्ही कांहीं । तरी सांडिलें येथ तें कायी ।
म्हणोनि कर्मत्याग नाहीं । प्रकृतिमंतां ॥ ५८ ॥

कर्म पराधीनपणें । निपजतसें प्रकृतिगुणें ।
येरीं धरी मोकलीं अंतःकरणें । वाहिजे वायां ॥ ५९ ॥

देखें रथीं आरुढीजे । मग जरी निश्चळ बैसिजे ।
तरी चंचळ होऊनि हिंडिजे । परतंत्रा ॥ ६० ॥

कीं उचललें वायुवशें । चळे शुष्क पत्र जैसें ।
निचेष्ट आकाशें । परिभ्रमे ॥ ६१ ॥

तैसें प्रकृतिआधारें । कर्मेंद्रियविकारें ।
निष्कर्मही व्यापारें । निरंतर ॥ ६२ ॥

म्हणोनि संग जों प्रकृतीचा । तंव त्याग न घडे कर्माचा ।
ऐसयाही करूं म्हणती तयांचा । आग्रहोचि उरे ॥ ६३ ॥

प्रकृतीचें अधिष्ठान = सत्ता, वसतिस्थान, देखरेख, ठिकाण, राहणें, जवळ येणें, अंमल-राज्य करणें, चाक, मागला दरवाजा, आशीर्वाद, पलंग (५३). वोसंडिलें = टाकिलें. निमाले = नाहींसें झालें (५४). आईकावें-ऐकावें. कीं-कि. नेत्राचें-नेत्रींचें (५५). कां-कि (निर्विकल्प). जालीसे-जाहालीसे (५६). कीं-कि. काई-काय (५७). ठाकेचि-ठकेचि. जऱ्ही-जरी. तरी-तऱ्ही. येथ तें-ते. प्रकृतिमंतां = देहाभिमान्याला; देहबुद्धीच्याच (५८). निपजतसें-निपजत असें. येरीं धरी-येरि धरि (५९). रथीं = रथावर. आरुढीजे-आरूढ होउन, स्वार होऊन (६०). वायुवशें = वायूच्या सपाट्यानें. शुष्क पत्र-वाळलेलें पान. निचेष्ट = हालचाल न करतां. परिभ्रमे = फिरत असतात (६१). प्रकृतिआधारें = शरीराच्या आश्रयानें. कर्मेंद्रियविकारें = कर्मेंद्रियांच्या हालचालींच्या द्वारां. निरंतर = नेहमीं (६२). संग = संबंध; सोबत. आग्रहोचि उरे = हट्ट मात्र उरणार आहे (६३).

जोंपर्यंत प्रकृतीचें अधिष्ठान तोंपर्यंत सांडणें, मांडणें, घेणें, त्यजणें हें अप्राप्त होय. जें कांहीं चेष्टणारें, हालणारें, येणारें तें गुणांच्या आधीनतेचें असें आपोआपच असतें कीं. (५३).

असें पाहा कीं, विहित कर्म जेतुलें—वर्णाश्रमांस हितकर-योग्य-जेवढें कर्म तें सर्वच टाकिलें (ओसंडिलें = खालीं टाकलें) तरी इंद्रियांचे स्वभाव काय नाहींसे झाले म्हणावेत?-शांत झाले समजावेत? (५४)

सांग बरें कीं—कानाचें ऐकणें बंद होत असतें?—कानानें आपला गुण ऐकण्याचा तो टाकून दिला होतो?—अथवा नेत्राचें देखणें तें नाहींसें झालें म्हणावें?-डोळ्यांमधील तेज काय नाहींसें होतें? तें तेथें असतेंच असतें—नासारंध्र बुजलें व त्यानें सुगंध घेण्याचें टाकलें तें-असें होतें काय? (५५)

अहो! प्राणाची, अपानाची गती–वेग खुंटला आहे काय? मती ही संकल्प-विकल्पहीन झाली आहे काय? तसेंच ह्या जीवदशेच्या ऊर्मी ज्या, क्षुधा, तृषा, जरा वगैरेच्या–त्या काय बंद पडल्या आहेत? त्या परिणाम करणाऱ्या आहेतच आहेत–होतच आहेत ना? (५६)

अहो, हे झोंपणें, स्वप्न पडणें का जागृत होणें, हें काय ठरलें–थांबलें? चरण काय चालणें ते विसरले आहेत काय? असें हें असो–पण जन्म–मृत्यु हे काय निमाले म्हणावेत? उपजणें, मरणें निमणें न चुकतां नित्य असें होतच असतें. (५७)

असें हें सर्व कांहीं बंद पडलेलें नाहीं; तर मग तेथें सांडिले–सवरिले–तें काय म्हणावें? आणि म्हणून, प्रकृतिमंतांना–देहधाऱ्यांना–केव्हांही कर्मत्याग नाहींच नाहीं हें समज! (५८)

प्रकृतीच्या गुणाधीनपणामुळें–(पराधीनपणामुळें)–प्रकृतीच्या गुणामुळेंच–कर्म हें निपजतें, उत्पन्न होतें. तेथें दुसऱ्याचीं मोकळीं अंतःकरणें तीं व्यर्थच कीं वाहणें होत आहे कीं! कर्म हें प्रकृतीच्या गुणामुळें होत असल्यामुळें पराधीन आहे; आणि म्हणून मी हें कर्म करीन (धरी) किंवा टाकीन (मोकळी–मोकलणें) असें अंतःकरणानें–मनानें व्यर्थ होय! (५९)

जाण कीं, रथावर चढावें व मग निश्चळ बसणें व्हावें–बसावें; तरी मग, अथवा परतंत्रामुळें चळणें होऊन हिंडावें कीं .... (६०)

वायुवशतेनें, उचलिलेलें शुष्क पत्र–झाडाचें वाळलेलें पान–चळतें; तें स्वतः हालचाल न करतां वर आकाशांत फेंकलें जातें. (६१)

तसें प्रकृतीच्या आधारामुळें, कर्म-इंद्रियांच्या विकारामुळें नैष्कर्म्य स्थितीला पोहोंचलेला पुरुषही (निरंतरचें घन, निरंतर, सान्द, निबिड) निरंतरपणें व्यापारतो, कर्म करतो, हालतो, चालतो, उठतो, बसतो. (६२)

म्हणून संग, सहवास देहाचा–उपाधी म्हणून प्रकृतीचा जंव, तंव कर्माचें सोडणें, टाकणें घडत नाहीं–व जे तसें तें त्याग करूं म्हणती तयांचा आग्रहच कीं उरतो (दुराग्रह, हेकाडपणा होय). (६३)

**कर्मेन्द्रियाणि संयम्य य आस्ते मनसा स्मरन्।**
**इन्द्रियार्थान्विमूढात्मा मिथ्याचारः स उच्यते ॥ ६ ॥**

[विमूढः = फसविलेला, मूढ, शहाणा. वि+मूह = चुकणें, गोंधळणें, मूढ होणें. यम्+सं = गांठ बांधणें, बंद करणें, गोळा करणें. संमूढः = विवाहित; सहचारी; स्वच्छ केलेला. मिथ्या = खोटा, गैरशिस्त, व्यर्थ, कपटाचा. मिथ्याचारः = ढोंगी, दांभिक. वच् (उच्यते) = बोलणें, सांगणें, वर्तन करणें, नाव देणें, म्हणणें, दर्शविणें, पाठ म्हणणें, निंदणें.]

**अन्वय :** यः विमूढात्मा। कर्मेन्द्रियाणि संयम्य। इन्द्रियार्थान् मनसा स्मरन् आस्ते। उच्यते सः मिथ्याचारः।

**अर्थ :** निष्काम कर्म, स्वधर्म, कर्मेंद्रियांना दाबून धरून मनानें विषयाचें स्मरण करीत राहणें म्हणजे काय–हें मूर्खपणाचें लक्षण नव्हे? यालाच सोंग ढोंग म्हणतां येणार नाहीं? (६).

**जे उचित कर्म सांडिती। मग नैष्कर्म्य हों पाहती।**
**परी कर्मेंद्रियप्रवृत्ती। निरोधुनी ॥ ६४ ॥**

**तयां कर्मत्याग न घडे। जें कर्तव्य मनीं सांपडे।**
**वरी नटती तें कुडें। दरिद्र जाण ॥ ६५ ॥**

**ऐसे ते पार्था । विषयासक्त सर्वथा ।**
**वोळखावे तत्त्वतां । भ्रांति नाहीं ॥ ६६ ॥**

**आतां देईं अवधान । प्रसंगे तुज सांगेन ।**
**या नैराश्याचें चिन्ह । धनुर्धरा ॥ ६७ ॥**

मांडिती–सांडिति. पाहति–पाहाती. नैष्कर्म्य = कर्मविमुक्त. निरोधुनि = आवरून, आंखडून धरून (६४). कुडें–फुडें = खरेंच, स्पष्ट (६५). भ्रांति नाहीं = संभ्रम नाहीं. (भ्रांति = मिथ्यामति, भ्रम) (६६). नैराश्याचें चिन्ह = निष्कामतेचें का निरिच्छपणाचें तें लक्षण (६७).

जें उचित कर्म सांडतात व यावर मगच नैष्कर्म्य होऊं पाहतात–पण कसें तर, कर्मेंद्रियाची प्रवृत्ति ती निरोधून पाहतात कीं– (६४)

त्यांना कर्मत्याग घडत नाहीं; कारण काय तर, त्यांच्या मनामध्यें कर्म करणें हें कर्तव्य तें अडून असतें, सांपडतें व यावर जें नैष्कर्म्यतेनें नटतात ते पुढें दरिद्रच! (निःस्वः दुर्विधः दीनः दरिद्रः दुर्गतः इति ५ दरिद्रस्य।) (६५)

असे पार्था, सर्वथा तत्त्वतः, निःसंशयतेनें, विषयासक्त जाणावेत–ओळखावेत, यासंबंधीं कांहींही भ्रांति (संशय, मिथ्यामति, भ्रम) ती नाहीं कीं! निःसंशयतेनें भ्रम नव्हें! (तत्त्वतः येथें भ्रांति नच). (६५)

आतां लक्ष देऊन ऐकत असावें, सहज प्रसंगानें निरिच्छपणाचें लक्षण–नैराश्याचें चिन्ह–मी हें तुजला सांगण्याचें करीत आहें. (६७)

**यस्त्विन्द्रियाणि मनसा नियम्यारभतेऽर्जुन ।**
**कर्मेन्द्रियैः कर्मयोगमसक्तः स विशिष्यते ॥ ७ ॥**

[कर्मयोगम् आरभते कर्मेन्द्रियैः = कर्म-इंद्रियांनीं कर्मयोगाचें आचरण आरंभाचें करतो–इन्द्रियाणि मनसा नियम्य = मनानेंच इंद्रियें आवरून धरून (जो)–सः असक्तः विशिष्यते = इंद्रियांचें नियमन करून मनानेंच कर्मयोग आचरतो तो विशेष कर्मयोगी म्हटला होय. (मागील श्लोकामध्यें–श्लोक क्र. ६—हट्टानें कर्मेन्द्रियें आवरून धरून मनानें विषय चिंतितो तो दांभिक म्हटला–पण आतां जो मनानें इन्द्रियांचें नियमन करून, निरासक्त होऊन, कर्मेन्द्रियांनीं कर्मयोग आचरतो तो विशेष होय.)]

**अन्वय :** अर्जुन! यः तु इन्द्रियाणि मनसा नियम्य कर्मयोगम् कर्मेन्द्रियैः आरभते । सः असक्तः विशिष्यते ।

**अर्थ :** परंतु अर्जुना! जो फलासक्तिरहित पुरुष शुद्ध बुद्धीनें मनासह ज्ञानेंद्रियांचें नियमन करून कर्मेंद्रियांनीं कर्मयोग करीत राहतो, तोच श्रेष्ठ होय (७.)

**जो अंतरीं दृढ । परमात्मस्वरूपीं गूढ ।**
**बाह्य तरी रूढ । लौकिक जैसा ॥ ६८ ॥**

**तो इंद्रियां आज्ञा न करी । विषयांचें भय न धरी ।**
**प्राप्त कर्म नाव्हेरी । उचित जें जें ॥ ६९ ॥**

**तो कर्मेंद्रियें कर्मीं । राहटत तरी न नियमी ।**
**परी तेथिचेनि ऊर्मी । झांकळेना ॥ ७० ॥**

**तो कामनामात्रें न घेपे । मोहमळें न लिंपे ।**
**जैसें जळीं जळें न सिंपे । पद्मपत्र ॥ ७१ ॥**

**तैसा संसर्गामाजी असे । सकळां सारिखा दिसे ।**
**जैसें तोयसंगें आभासे । भानुबिंब ॥ ७२ ॥**

**तैसा सामान्यत्वें पाहिजे । तरी साधारणचि देखिजे ।**
**येरवी (निर्धाता) निर्धारितां नेणिजे । सोय जयाचि ॥ ७३ ॥**

**ऐशा चिन्हीं चिन्हितु । देखसी तोचि मुक्तु ।**
**आशापाशरहितु । वोळख पां ॥ ७४ ॥**

**अर्जुना तोचि योगी । विशेषीं जो जगीं ।**
**म्हणोनि ऐसा होय याचिलागीं । म्हणिपें तूंतें ॥ ७५ ॥**

**तूं मानसा नियम करीं । निश्चळ होई अंतरीं ।**
**मग कर्मेंद्रियव्यापारीं । वर्ततू सुखें ॥ ७६ ॥**

परमात्मस्वरूपीं–परमात्मरूपा (परात्मरूपी) बाह्यात्कारी लोकाचाराप्रमाणें वागणारा–आचरणारा. (बाह्य = लौकिक. रूढ) अंतरीं दृढ = अंतःकरणीं–मनानें निश्चळ असा (६८). प्राप्त = उचित कर्म जें जें. नाव्हेरी = उचित–अवसरोचित कर्में भागाला, वाट्याला आलेलीं तीं तो टाकीत नाहीं. विषयांचें भय न धरी = (विषय = इंद्रिय शब्दादिकः शब्दस्पर्शरूपरसगंधाश्च विषयाः । विषयः आश्रयः इति २ आश्रयस्य । देश विषय उपवर्तनम् इति ३ । ग्रामसमुदाय लक्षणस्य देशमात्रस्य । विषय = पति, प्रकरण, बाब, टप्पा. आज्ञाकर = सेवक. आज्ञा = बंदोबस्त, परवानगी, व्यवस्था, हुकूम. आज्ञा = अपवादस्तुनिर्देशो निदेशः शासनं च सः शिष्टि आज्ञा । अपवाद निर्देश, शासन, शिष्टि । आज्ञा इति ६ । कर्माज्ञापनस्य ।) (६९). राहटत–राहटता = वागत असतां. झांकळेना–झांकोळेना. न नियमी–नियेमी = आवरीत नाहीं; स्वाधीन ठेवतो. ऊर्मी = विकाराधीन होत नाहीं (तुका म्हणे थोडें आहे । आली उर्मी साहुनि राहे ॥ ऊर्मीचा गुलाम न होणें हेंच मनोजयाचें वर्म जाण.) ऊर्मी = जीवींचे ६ धर्म–क्षुधा, तृषा, जरा, मृत्यु, शोक, मोह; उत्कंठा, परिणाम, समुदाय, वेग, लाट, प्रकाश, प्रवाह, वस्त्राची चुनी, निरी, इत्यादि. ऊर्मीमद = ऊर्मीमालिन = (१) वांकडे काळे केंस; (२) समुद्र–हेलकावे खाणारे. ऊर्मिका = आंगठी. (७०).

कामनामात्रें न घेपे = वासनाबद्ध होत नाहीं. सिंपे–शिणें = भिजत नाहीं (७१). संसर्गामाजी = संसारांत. आभासे = दर्शन, तेज, प्रकाश. आभास = भ्रम, भास, सादृश्य, प्रकाश, प्रतिबिंब. भास्+आ = प्रकाशित करणें, शोभविणें (७२). तैसा–तैसें. सामान्यत्वें पाहिजे = सर्वसाधारण, मध्यम, वेश्या, सार्वत्रिक नियम, साधारण धर्म. तरी साधारणचि देखिजे = एक हेतु, आभास, वेश्या, समाईक. (निर्धाता)–निर्धारितां = निश्चितार्थ, ठरविणें, निवडणें, राखणें, रोंखणें, प्रेरणें, ध्यानांत ठेवणें, निश्चय करणें, सोय = मार्ग, स्थिति. चिन्हितु–चिन्हित (चिन्ही चिन्हितु = खुणेनें लक्षणाचा. आशापाशरहितु = वासनापाशरहित (७४). विशेषीं–विशेषिजे = विशेष वर्णिला जाणारा. याचिलागीं–यालागीं. म्हणिपें = म्हणतो (७५). होईं–होये. कर्मेंद्रिय–कर्मेंद्रियें. नियम (नियमन) = दमन, आकलन. निश्चळ होई अंतरीं = अंतःकरणानें–मनानें निश्चळ, स्थिर होऊन असत जा. (७६).

जो अंतःकरणानें दृढ, निश्चल, परमात्मरूपी गूढ, (गूढम्, गुप्तम्,) बाह्यकारी लोकाचाराप्रमाणें वागणारा, लौकिकाचा असा–(६८)

तो इंद्रियांना आज्ञा नच करणारा, विषयाचें भय न धरणारा–भागाला (वांट्याला) आलेलीं उचित आणि अवसरोचित जीं जीं कर्में तीं नच टाकणारा. (६९)

हात, पाय इत्यादि कर्मेंद्रियांनीं जो कर्मामध्यें-प्रवृत्तींत राहावत-वर्तत, वागत असतां, इंद्रियें स्वाधीन ठेवतो-इंद्रियांचें नियमन करतो, तेथच्या वेगामुळें-आवेशामुळें सुख-दुःखांत गुंतत नाहीं. (इंद्रियांच्या ऊर्मी झाकोळेना) (हातपाय इत्यादि कर्मेंद्रियांनीं कर्मांत-प्रवृत्तींत वागत-वर्तत असतां इंद्रियांचें नियमन करितो, इंद्रियें स्वाधीन ठेवतो; पण तेथच्या आवेशानें-वेगानें-झाकोळेना-सुखदुःखांत गुंतत नाहीं.) (७०)

तो इच्छावशेंकरून-वासनेनें बद्ध होत नाहीं; मोहाच्या घाणीनें मळत नाहीं, लिंपत नाहीं. जसें जळामध्यें जळानें कमळाचें पान भिजत नाहीं (ना सिंपे)-(७१)

तसा संसारांत-संसर्गामध्यें-असतो; सकळांच्या सारखा दिसतो; जसें का तोय-पाण्यासंगें भानुबिंब आभासतें-जसें दिसते तसें- (७२)

तसें साधारणपणें पाहिलें तर तो साधारणच एक असा दिसतो. एरव्हीं निर्धारावर जाणणें होत नाहीं-जें का त्याची सोय-आत्मस्थिति का खोली ती कशी- (७३)

अशा चिन्हांनीं युक्त, चिन्हित पाहिलास तर तोच मुक्त म्हणावा. तो आशापाशरहित असा तूं ओळख. (७४)

अर्जुना! तोच योगी जो का विशेष प्रकारें जगांत स्तविला जातो (विशेषिजे) आणि म्हणून यालागीं तूं असा योगी-मुक्त-हो, असें तुला माझें सांगणें आहे (७५).

तूं आपलें मानस नियमाचें कर, अंतरीं निश्चल हो; व मग कर्मेंद्रियें तीं सुखांत व्यापारी-वर्तत-वागत असोत- (७६)

**नियतं कुरु कर्म त्वं कर्म ज्यायो ह्यकर्मणः ।**
**शरीरयात्राऽपि च ते न प्रसिद्ध्येदकर्मणः ॥ ८ ॥**

[अकर्मणः कर्म ज्यायः = कर्म न करण्यापेक्षां कर्म करणें श्रेयस्कर. त्वं नियतं कर्म कुरु-इंद्रियें आवरून धरून, नियत होऊन तूं कर्म कर. अकर्मणः ते शरीर यात्रा अपि न प्रसिद्ध्येत्=अकर्मणः-कुकर्मणः-कर्म नच करण्यानें तुझी देहयात्रा ही सफळ होणार नाहीं. प्रसिद्ध्येत्-सिध्+प्र = सिद्धीस जाणें, प्राप्त होणें, भूषविणें. शरीरयात्राः = देहरूपी गाडीचा निर्वाह. [यात्रा = गाडी, वेळ घालविणें, प्रवास, फिरणें, चरितार्थ, निर्वाह, व्यवहार, वहिवाट (रुढी).] अकर्मन् = १. मोक्ष, २. क्रियाराहित्य, ३. पाप, गुन्हा, ४. निषिद्ध कर्म. ज्यायस् = १. वडील, २. श्रेष्ठ, उत्तम, ३. मोठें, विस्तृत, ४. जीर्ण, वृद्ध, ५. वयांत आलेला. नियतम्=ताब्यांत ठेवलेला, बांधलेला, पाळलेला, जितेंद्रिय, स्थिर, निश्चित, ठरावीक, एकाग्र, अनिवार्य, नेहमीं, वर्णविहित.]

**अन्वय :** अकर्मणः हि कर्म ज्यायः । त्वं नियतं (वर्णविहित) कर्म कुरु । ते शरीरयात्रा अपि अकर्मणः च न प्रसिद्ध्येत् ।

**अर्थ :** अर्जुना! तूं आपलें कर्म-वर्णविहित असें-शुद्ध बुद्धि नियंत्रित असें कर. कारण कर्म न करण्यापेक्षां, कर्म करणें-क्रियासहिततेनें असणें हें श्रेयस्कर आहे. क्रियाराहित्य म्हणजे कर्म केल्याशिवाय-(तुझी जीवितयात्रा)-तुझें जीवित देखील चालणार नाहीं व त्यास सिद्ध किंवा साधक यांची कल्पनाही होणार नाहीं.

**म्हणसी नैष्कर्म्य होआवें । तरी येथें तें न संभवे ।**
**आणि निषिद्ध (निषितध) केविं राहाटावें । विचारीं पां ॥ ७७ ॥**
**म्हणोनि जें जें उचित । आणि अवसरेंकरूनि प्राप्त ।**
**तें कर्म हेतुरहित । आचर तूं ॥ ७८ ॥**

**पार्था आणिकहि (येक) एक। नेणसी तूं हें कवतुक।**
**जें ऐसें कर्ममोचक। आपैसें असे ॥ ७९ ॥**

**देखें अनुक्रमाधारें। स्वधर्म जो आचरे।**
**तो मोक्ष तेणें व्यापारें। निश्चित पावे ॥ ८० ॥**

म्हणसी–म्हणौनि. नैष्कर्म्य = कर्मरहित व्हावें. तरि येथें–तरी एथ. निषित्ध–निषिद्ध = शास्त्रविरुद्ध (७७). आचर तूं–आचरे तूं. उचित = योग्य. अवसरेंकरूनि प्राप्त = प्राप्तकाळेंकरूनि प्राप्त झालेलें (७८). कवतुक-कवतिक. कर्ममोचक = मोक्ष (७९). अनुक्रमाधारें = परंपरा; पद्धत; क्रमाच्या आधारानें (अनुक्रमणें) = चरित्र, वर्णन, मागून जाणें (८०).

म्हणून नैष्कर्म्य–कर्मरहित–असावें, व्हावें, होआवें; तरी तसें तें येथें मुळींच संभवाचें होणारें नव्हें व असें जर, तर मग निषिद्ध जें तेंच कीं, विचारांत घे कसें बरें, राहाटावें–आचरावें तें! (७७)

म्हणून जें जें उचित–प्रसंगेंकरूनच प्राप्त होणारें, झालेलें–तें कर्म तुवां हेतु, कारण, बीज नच ठेवून आचरण्याचें करावें. (७८)

पार्था! आणिक एक तूं कांहीं जाणत नाहींस-कौतुक आहे तें–जें कां असें हें निष्काम कर्म-कर्माच्या बंधापासून सहज सोडवितें! (७९)

असें पाहा कीं, पूर्वींच्या अनुक्रमाच्या आधारानें (पूर्वींच्या परिपाठावर–चाल–परंपरा) स्वतःचा धर्म–कर्तव्य–जो आचरील, त्या आचरणानें (त्या व्यवहारानें) तो निश्चित मोक्ष पावतोच–पावेलच! (८०)

**यज्ञार्थात्कर्मणोऽन्यत्र लोकोऽयं कर्मबन्धनः।**
**तदर्थं कर्म कौन्तेय मुक्तसंगः समाचर ॥ ९ ॥**

[यज्ञ = पूजा होम, ब्रह्मा, विष्णु. अर्थात् = खरोखर, ओघानेंच. अन्यत्र = खेरीज, दुसऱ्या ठिकाणीं. अयं लोकः = हा मृत्युलोक (लोकः = व्यवहार, विश्व, लोक, पृथ्वी, प्रजा, समुदाय, व्यवहार, प्रकाश, विषय, फल, भोग्य वस्तु.) कर्मबन्धनः = कर्मबंधनाचा होतो. कर्मन् = कृत्य करणें, दैवगति, शेती, (कर्मण्य = उद्योग, कर्मास योग्य). नत् अर्थम् = यज्ञार्थम्. मुक्तसंगः = उपाधि–आसक्तिरहित होऊन. समाचार = करणें, वागणें, वागवणें, आश्रयणें, हिंडणें, संसर्ग ठेवणें (चर+सा) [समा+चर् (आ)]]

**अन्वय :** तत् यज्ञ अर्थात् अन्यत्र कर्म कर्मबंधनः तस्मात् तत् यज्ञ अर्थम् कर्म आचर स मुक्तसंगः।

**अर्थ :** पूजा, होम, विष्णु वर्णविहित उपासनेच्या हेतूखेरीज इतर हेतूनें कर्म केलें असतां हा जीव कर्मबंधनानें युक्त होतो, म्हणून अर्जुना! तूं अनासक्त होऊन आपलें कर्म उपासनेच्या हेतूनेंच कर (९).

**स्वधर्म जो बापा। तोचि नित्य यज्ञ जाण पां।**
**म्हणोनि वर्ततां तेथ पापा। संचार नाहीं ॥ ८१ ॥**

**हा निजधर्म जैं सांडे। कुकर्मीं रति घडे।**
**तैंचि बंधन पडे। संसारिक ॥ ८२ ॥**

**म्हणोनि स्वधर्मानुष्ठान। तें अखंड यज्ञयाजन।**
**जो करी तया बंधन। कधिंचि न घडे ॥ ८३ ॥**

**हा लोक कर्मे बांधला । जो परतंत्रा भुलला ।**
**तो नित्ययज्ञातें चुकला । म्हणोनियां ॥ ८४ ॥**

**आतां येचिविषयीं पार्था । तुज सांगेन (येकि) एकि कथा ।**
**जे सृष्ट्यादि (संस्छा) संस्था । ब्रह्मेनि केली ॥ ८५ ॥**

नित्य यज्ञ जाण–नित्य ब्रह्म जाण. संचार=रीघ (८१). कुकर्मीं–आणि कुकर्मि. बंधन पडे-बंध पड. संसारिक–सांसरिक (८२). करी–करि. कधिंचि–कहींच (८३). भुलला–भूलला (८४). सांगेन (येकि) एक कथा–सांगेन एक मी कथा. जे–जैं. ब्रह्मेनि = ब्रह्मदेवानें (८५).

अहो बाप्पा! स्वधर्म जो, तोच कीं नित्य यज्ञ जाणावा. आपला धर्म जो तोच नित्याचा यज्ञ म्हणून–स्ववर्णप्रमाणें नित्य नैमित्तिक सदाचार हाच यज्ञ, याग, होम, पूजा करणें असें वर्तत असतां दोषास शिरकाव नाहीं, पापाचा शिरकाव–संचार–होत नाहीं. (८१)

हा निज धर्म, निज, नित्य ब्रह्म–जेव्हां का सांडला–त्यजिला–सोडला होतो, तेव्हांच मुळीं कुकर्म म्हणजे –स्वधर्माला सोडून केलेलें परधर्माचें आचरण–तेथें रति घडते न घडते तोंच कीं–सांसारिक हें बंधन पडणारें होतें! (८२)

म्हणून स्वधर्मानुष्ठान हेंच अखंड असें यज्ञ–याजन जो करीत राहतो, त्याला कधींही बंधन पडत नाहीं. (बंधन पडत आहे असें घडत नाहीं) (८३).

भूलोकीं–मानवी समाज–कर्म त्याचे मागें लागलें आहे. हा लोक कर्मे बद्ध झाला जो का परतंत्रास–मायेस भुलल्यामुळेंच कीं (अविद्येस भुलल्यामुळें आणि म्हणूनच कीं तो) नित्ययज्ञास चुकला (नित्याच्या कर्तव्यास चुकला)–म्हणूनच कीं मायेस भुलला– (८४).

आतां यासंबंधीं पार्था, तुजला एक कथा मी सांगेन. जें कांहीं ही सर्व सृष्टि आदिकरून संस्था ब्रह्मदेवानें केली आहे त्याबाबत– (८५)

**सहयज्ञाः प्रजाः सृष्ट्वा पुरोवाच प्रजापतिः ।**
**अनेन प्रसविष्यध्वमेष वोऽस्त्विष्टकामधुक् ॥ १० ॥**

[सहयज्ञाः =पूजा, विष्णु, होम, याग. प्रजाः =संतति, वंशज. प्रजागर=जाग्रण, दक्षता. सृष्ट्वा= उत्पन्न करून. पुरा = पूर्वीं, प्राचीन काळीं, प्रथम. प्रजापतिः उवाच = ब्रह्मदेव म्हणाला. प्रसविष्यध्वम् = संततिवृद्धि करा. एष वः इष्ट कामधुक् अस्तु = हे याग तुम्हांस कामधेनूप्रमाणें होवोत.]

**अन्वय :** पुरा । प्रजाः । सहयज्ञाः सृष्ट्वा । प्रजापतिः उवाच । अनेन यज्ञेन प्रसविष्यध्वम् । एष यज्ञः । वः । इष्ट कामधुक् अस्तु ।

**अर्थ :** पूर्वी कल्पारंभीं (सृष्टीच्या आरंभीं) यज्ञाबरोबरच प्रजा उत्पन्न केल्या. त्यांना प्रजापति म्हणाला–ह्या यज्ञांनीं तुम्हीं आपल्या इच्छा पूर्ण करून घ्या. ह्या यज्ञांनीं (तुम्हीं प्रजा उत्पन्न करा) वृद्धि करून घ्या. हे यज्ञ तुम्हांस कामधेनूप्रमाणें होतील (१०).

**तैं नित्य यागसहितें । सृजिलीं भूतें समस्तें ।**
**परी नेणतीचि तिये यज्ञातें । सूक्ष्म म्हणोनि ॥ ८६ ॥**

**ते वेळीं प्रजीं विनविला ब्रह्मा । देवा आश्रयो काय येथ आम्हां ।**
**तंव तो म्हणे कमळजन्मा । भूतांप्रति ॥ ८७ ॥**

**तुम्हां वर्णविशेषवशें । आणि हा स्वधर्म विहीत असे ।**
**यातें उपासा मग आपैसें । काम पुरति ॥ ८८ ॥**
**तुम्हीं व्रतें नियम न करावे । शरिरातें न पीडावें ।**
**दूरि कहिं न वंचावें । तिर्थासि गा ॥ ८९ ॥**
**यागादिकें साधनें । साकांक्ष आराधनें ।**
**मंत्रयंत्रविधानें । झणीं करा ॥ ९० ॥**
**देवतांतरा न भजावें । जें सर्वथा कांहीं न करावें ।**
**तुम्हीं स्वधर्मयज्ञ यजावे । अनायासें ॥ ९१ ॥**
**अहेतुकें चित्तें । अनुष्ठा पां ययातें ।**
**पतिव्रता पतीतें । जयापरि ॥ ९२ ॥**
**तैसा स्वधर्मरूप मखु । हाचि सेव्य तुम्हांसि एकु ।**
**ऐसें सत्यलोकनायकु । म्हणता जाला ॥ ९३ ॥**
**देखा स्वधर्मातें भजाल । तरी कामधेनु हा होईल ।**
**मग प्रजा हो न संडील । तुमतें कदा ॥ ९४ ॥**

परी–परि. म्हणोनि–म्हणउनि. भूतें समस्तें नित्य यागसहितें सृजिलीं = प्राणिमात्र; प्राणिगण; प्राणि व त्यांचे नित्य यज्ञ, याग, धर्म हीं बरोबरच उत्पन्न केलेलीं. सूक्ष्म = गहन, गूढ; अध्यात्मं, आत्मन्यधिकृतं, लिंग देहम् अपि सूक्ष्मम् (८६). देवा आश्रय काय येथ आम्हां–देवा काय आश्रयो एथ आम्हां. आश्रयो = आश्रय, आसन, यानम्, अवलंबन, आश्रयस्थान, आसरा (८७). विहीत असे–विहीति असे–विहिला असे. काम पुरति–पुरती काम. उपासा = भजा; निश्चित केला (८८). व्रतें–व्रत. कहिं–कैंहि (८९). झणीं–झणिं. साकांक्ष = सकाम. आराधनें = तांत्रिक अनुष्ठानें-इष्ट दैवत इच्छावशें कुटुंबपोषण व्हावें म्हणून (तंत्रणं–तंत्रकं = कोरें वस्त्र) (९०). जे सर्वथा–सर्वथा. स्वधर्मयज्ञ यजावे–स्वधर्मयज्ञीं यजावें तुम्हीं–तुम्हि (९१). अहेतुकें–अहतुकें. ययातें–यातें. जयापरि–जियापरि (९२). तैसा–तरि. मखु–मख. तुम्हांसि एकु–तुम्हां एक. नायकु–नायक. म्हणता जाला–बोलता जाहला (९३). तरी–तरि (९४).

समस्त भूतें हीं नित्ययज्ञाबरोबरच उत्पन्न केलेलीं. प्राणी व त्यांचे धर्म बरोबरच उत्पन्न केले. पण तो यज्ञ गहन असा, गूढ असा असल्यानें तीं भूतें त्या यज्ञासंबंधीं नेणतेंपणच वागवून आहेत. (८६)

तेव्हां प्रजांनीं ब्रह्मदेव बनविला–ब्रह्मदेवास विनवणी केली कीं–देवा, आम्हांस येथें आधार–नितांत हिताचा मार्ग–तो कोणता कीं! तेव्हां परमेश्वराच्या नाभिकमळापासून झालेला ब्रह्मदेव–प्रजापति–भूतांप्रति म्हणत आहे कीं– (८७)

तुम्हां प्रत्येक वर्णास–ब्राह्मण. क्षत्रिय, वैश्य, शूद्र ह्या चार वर्णास धरून-स्वधर्म हाच यज्ञ (विधीला) सांगितला. हाच यज्ञ–स्वधर्म–श्रद्धापूर्वक भजा, स्वधर्मानें वागा म्हणजे इच्छित मनोरथ पूर्ण होतील. मियातें (मला) उपासा–माझी उपासना करा–मग तुमच्या इच्छा पूर्ण होतील. (८८)

अहो, तुम्हीं कृत्स्न चांद्रायणादि कामनिक, तसेंच कामनिक नियम (आचार) न करावे. शरीरास दुःख देऊं नये. (उपास-तापासादिनीं दूर तीर्थास, पवित्र स्थानास, कोठेंही जाऊं नका.) (८९)

ईश्वरप्राप्तीकरितां हठयोगादि क्रिया, कामनिक उपासना (साकांक्ष आराधनें), मीमांसकांची–वैदिकांची मंत्रविद्या, मांत्रिकांचें मंत्रविधान इत्यादींच्या खटाटोपांत पडूं नका. कदाचित् पडाल तर संशयार्थक, निषेधार्थक होणें हें! (९०)

दुसऱ्या अनेक देवताना भजूं नये—असें कांहींही करूं नये. तुम्हीं स्वधर्मरूपी यज्ञ यजावा, भजावा, पूजावा, सहजीं सहजच कीं ! (९१)

हेतु नच ठेवून, चित्त हें निर्हेतुक करून ह्या स्वधर्मरूप यज्ञास आचरावें, अनुष्ठावें–जशी का पतिव्रताच एक पतीस अनुष्ठानानें वरते जशी ! – (९२)

तसा स्वधर्मरूपी यज्ञच कीं हाच एक तुम्हांस भजण्यास– सेवण्यास–योग्य जाणा, असें सत्यलोकींचे ब्रह्मदेव बोलिले–बोलते झाले. (९३)

समजा, ऐका, देखा, पाहा, पाहा कीं–तुम्हीं स्वधर्मास भजाल तर हा स्वधर्मच कामधेनूप्रमाणें इच्छित मनोरथ पूर्ण करणारा होईल. एऱ्हवीं हाच स्वधर्म कीं सदान्‌कदा तुम्हांस नाडील–अडथळा आणील कीं ! (९४)

**देवान्भावयतानेन ते देवा भावयन्तु वः ।**
**परस्परं भावयन्तः श्रेयः परमवाप्स्यथ ॥ ११ ॥**

[अनेन = यनेन : भावयत = संतुष्ट करा. देवाः ते वः भावयन्तु = ते देव तुम्हांस संतुष्ट करोत. तुमचीं सुखें वृद्धिंगत करोत. परस्परं भावयन्तः = एकमेकांना संतुष्ट करणारे तुम्हीं–परमश्रेयास–कल्याणाम पावाल–स्वर्गास पावाल.]

**अन्वय** : अनेन भावयत देवान् । ते देवाः । वः । भावयन्तु । भावयन्तः परस्परम् । परम् (परमं) श्रेयम् अवाप्स्यथ ।

**अर्थ** : तुम्हीं या यज्ञाच्या योगानें देवांना संतुष्ट करा; व यावर ते देव तुम्हांला संतुष्ट करोत. यामध्यें, यायोगें एकमेकांना संतुष्ट करणारे तुम्हीं परमश्रेय पावाल (११).

**जे येणेंकरूनि समस्तां । परितोष होईल देवतां ।**
**मग ते तुम्हां ईप्सितां । अर्थातें देती ॥ ९५ ॥**

**या स्वधर्मपूजा पूजितां । देवतागणां समस्तां ।**
**योगक्षेम निश्चितां । करिती तुमचा ॥ ९६ ॥**

**तुम्ही देवतांतें भजाल । देव तुम्हां तुष्टतील ।**
**ऐसी परस्पर घडेल । प्रीति तेथ ॥ ९७ ॥**

**तेथ तुम्ही जें करूं म्हणाल । ते आपैसी सिद्धी जाईल ।**
**वांछितही पुरेल । मानसींचें ॥ ९८ ॥**

**वाचासिद्धी पावाल । आज्ञापक होआल ।**
**म्हणिये तुम्हां मागतील । महाऋद्धि ॥ ९९ ॥**

**जैसें ऋतुपतीचें द्वार । वनश्री निरंतर ।**
**वोळगे फळभार । लावण्येसीं ॥ १०० ॥**

ईप्सितां = इच्छित, इष्ट, इच्छा, (ईप्सित फलं = मोहाचा नारळ. ईप्सु = इच्छिणारा.) परितोष = समाधान, संतोष, सुख, परितुष्टि (९५). पूजा पूजितां–पुजा पुजिता (९६). तेथ–जेथ (९७). आपैसी– आपैसे. वांछितहि–वांछीतही = इच्छा ही. मानसींचें–मानसिचे (९८). वाचासिद्धी पावाल = बोलाल तें खरें होईल. आज्ञापक होआल = विश्वेवर स्वामित्व मिळेल. म्हणिये तुम्हां मागतील = मोठ्या रिद्धि म्हणतील, काय पाहिजे? काय सेवा करूं बोला? (९९). ऋतुपति = वसंत. निरंतर = नित्य, सतत, चिकटलेली, कळकळीची, पूर्ण, एकरूप, अभिन्न, न झाकलेली अशी. वोळगे फळभार = फळपुष्पभार येणारी अशी. लावण्येसीं = लावण्यानें रसरसलेली (१००).

······ ज्यायोगें समस्त देवतांना परितोष होईल; व असें झाल्यानें जें तुम्हीं इच्छाल तें तुमचें इच्छित तुम्हांस देव देतील. (९५).

आपल्या धर्मानें पूज्य–भजण्यास योग्य–समस्त देवगणांस, सूर्य, अग्नि, इत्यादींस पूजणें–भजणें केल्यानें, तुमच्या सर्व सुखाचा जीवनक्रम देव चालवितील. खात्रीनें, निःसंशय ते तुमचा जीवनक्रम सुखाचा करतील. अप्राप्य आत्मवस्तूची प्राप्ति तो योग व प्राप्तीचें संरक्षण तो क्षेम–योगक्षेम, निश्चित तो तुमचा सुखावह करतील. (९६)

तुम्हीं देवांना भजाल, देव तुम्हांवर संतोषित होतील; व याप्रमाणें का अशी ही परस्पर-प्रीति घडेल जेथ कीं– (९७)

तो तुम्हीं जें कांहीं करूं म्हणाल तें आपोआपच सिद्धीस जाईल–मानसींचें वाञ्छित–इच्छितही पुरतें होईल–सफळ होईल. (९८)

वाचासिद्धि पावाल, आज्ञापक होआल, म्हणिये तुम्हां मागतील, महाऋद्धि–स्वधर्मनिष्ठ पुरुषाच्या अंगीं कोणतें सामर्थ्य येतें तें–स्वधर्मरूप यज्ञ करा; म्हणजे तोंडानें बोलाल तें होईल, स्वामित्व मिळेल व मोठाल्या रिद्धि तुमची म्हणिये म्हणजे सेवा करतील. (९९)

ऋतूंमध्यें पहिला वसंत, अशा वसंताच्या प्रारंभीं जशी वनश्री फलपुष्पभाराच्या लावण्यासह प्रगट होते–वनश्री निरंतरची येऊन असते (वोळगे)– (१००)

**इष्टान्भोगान्हि वो देवा दास्यन्ते यज्ञभाविताः ।**
**तैर्दत्तानप्रदायैभ्यो यो भुङ्क्ते स्तेन एव सः ॥ १२ ॥**

[दास्यन्ते = देतील (चाकराप्रमाणें निश्चयानें देतीलच). तैः दत्तान् = देवांनीं त्या दिलेल्या सुख व उपभोगाबद्दल. देवेभ्यः – एभ्यः = देवांना. अप्रदाय = न देतां. यः भुङ्क्ते = जो उपभोग घेतो. सः = तो. स्तेन = चोरच. एव = होय. यज्ञभाविताः देवाः = यज्ञहविर्भागानें संतुष्ट झालेले देव. वः = तुम्हांला. इष्टान् भोगान् हि = भोग इष्ट असे, आवडणारे ते, ऐहिक.]

**अन्वय :** यज्ञभाविताः देवाः हि । इष्टान् भोगान् दास्यन्ते । तैः दत्तान् । एभ्यः अप्रदाय यः भुङ्क्ते । सः स्तेन एव ।

**अर्थ :** कारण यज्ञानें–यज्ञहविर्भागानें–उपासनेनें संतुष्ट झालेले देव तुम्हांला इष्ट म्हणजे ऐहिक सुखें, प्रिय व भोग्य वस्तु देतील. देवांनीं दिलेल्या भोग्य वस्तु त्यांना समर्पण केल्यावाचून–त्यांचें त्यांना परत न देतां –जो उपभोगतो तो पुरुष "स्तेन" चोरच (अंगचोर) होय (१२).

**तैसें सर्व सुखेंसहित । दैवचि मूर्तिमंत ।**
**येईल देखा काढत । तुम्हांपाठीं ॥ १०१ ॥**

**ऐसे समस्त भोगभरित । होआल तुम्ही अनार्त ।**
**जरी स्वधर्मकर्मीं रत । वर्ताल बापा ॥ १०२ ॥**

**कीं जालया सकळ संपदा । जो अनुसरेल इंद्रियमदा ।**
**लुब्ध होउनियां स्वादा । विषयांचिया ॥ १०३ ॥**

**तिहीं यज्ञभाविकीं सुरीं । जे हे संपत्ति दिधली पुरी ।**
**तयां स्वमार्गीं सर्वेश्वरीं । न भजेल जो ॥ १०४ ॥**

**अग्निमुखीं हवन । न करील देवतापूजन ।**
**प्राप्त वेळे भोजन । ब्राह्मणाचें ॥ १०५ ॥**

**विमुख होईल गुरुभक्ती । आदर न करील अतिथी ।**
**संतोष नेदील ज्ञाती । आपलीये ॥ १०६ ॥**

**ऐसा स्वधर्म क्रियारहितु । आथिलेंपणें गर्वितु ।**
**केवळ भोगासक्तु । होईल जो ॥ १०७ ॥**

**तया मग अपाय थोर आहे । जेणें तें सकळ हातिंचें जायें ।**
**देखा प्राप्तिहि न लाहे । भोग भोगूं ॥ १०८ ॥**

**जैसें गतायुष्य शरीरीं । चैतन्य वास न करी ।**
**कां निदैवाच्या घरीं । लक्ष्मी जैसी ॥ १०९ ॥**

**तैसा स्वधर्म जो लोपला । तरी सर्व सुखाचा थारा मोडला ।**
**जैसा दीपासवें हरपला । प्रकाश जाये ॥ ११० ॥**

**तैसी निजवृत्ति जेथ सांडे । तेथ स्वतंत्रते वस्ती न घडे ।**
**आइका प्रजाहि हो पुढें । विरंचि म्हणे ॥ १११ ॥**

**म्हणोनि स्वधर्म जो सांडील । तयातें काळ दंडील ।**
**चोर म्हणोनि हरील । सर्वस्व त्याचें ॥ ११२ ॥**

**मग सकळ दोष भंवतें । गिंवसूनि घेती तयातें ।**
**रात्रिसमयीं स्मशानातें । भूतें जैसीं ॥ ११३ ॥**

**तैसि त्रिभूवनींचीं दुःखें । आणि नानाविध पातकें ।**
**दैन्यजात जितुकें । तेथेंचि वसे ॥ ११४ ॥**

**ऐसें होय तयां उन्मत्ता । मग न सुटे बापा रुदतां ।**
**कल्पांतींहि सर्वथा । प्राणिगण हो ॥ ११५ ॥**

**म्हणोनि निजवृत्ति न सांडावी । इंद्रियें वरळों नेदावीं ।**
**ऐसें प्रजेतें शिकवी । चतुरानन ॥ ११६ ॥**

**जैसें जळचरां जळ सांडे । आणि तत्क्षणीं मरण मांडे ।**
**हा स्वधर्म तेणें पाडें । विसंबो नये ॥ ११७ ॥**

**म्हणोनि तुम्हीं समस्तीं । आपुलाला कर्म उचितीं ।**
**निरंतर होआवें पुढतपुढती । म्हणिपत असें ॥ ११८ ॥**

देवचि मूर्तिमंत = प्रत्यक्ष देवच एक. काढत येईल तुम्हांपाठीं = तुम्हीं–जे भोग मिळालेले–त्या तुम्हांस हुडकीत येईल (१०१). भोगभरित = भोगानें पुष्ट झालेले; पूर्ण भारयुक्त. होआल अनार्त = निरिच्छ व्हाल; सर्व इच्छा तृप्त झालेले असे. स्वधर्मकर्मीं रत वर्ताल = आपल्या धर्मरूपी कर्मामध्यें, यज्ञामध्यें जर रत–आनंदित होउन वर्तत–वागत राहाल तर (१०२). जालया–जालिया = सर्व संपत्ति अनुकूल झाल्यानें, विषयाच्या स्वाद–रुचीवर लुब्ध होऊन इंद्रियांच्या मत्तपणाचा होऊन असेल जो (१०३). **यज्ञभाविकीं–यज्ञभाविती = यज्ञ, स्वधर्मकर्म अनुष्ठानानें, स्वरूपाप्रत पावलेल्या, स्वमार्गीं–स्वधर्मीं = (संतुष्ट झालेल्या देवांनीं) स्ववर्णोचित कर्तव्य.** (स्व–वाट, खूण, चालरीत, साधनामध्यें) (१०४). **अग्निमुखीं हवन** = जेथून ज्वाला निघते त्या अग्नीच्या

मुखामध्यें हवन, द्रव्य आहुती नच करील. न करील देवतापूजन = (देवदेवता = देव, कारण, मूर्ति, देव-शक्ति, इंद्रिय)–देवतेचें पूजन, अर्चा, सन्मान न करील. प्राप्त वेळे भोजन ब्राह्मणाचें = वखसाकाळ भोजन तें ब्राह्मणानेंच करणें, तसें ब्राह्मणाचें तें होणारें (१०५).

विमुख होईल = तोंड फिरवील, विरुद्ध होईल. गुरुभक्ति = आचार्य-उपासना. अतिथी = अभ्यागत, पाहुणा. संतोष = समाधान, (आंगठा व तर्जनी), तृप्ती. आपलीये = आपल्या नातलगांना (१०६). स्वधर्म = नित्ययज्ञ. क्रियारहितु–(क्रिया) रहित [क्रिया = धर्मकृत्य]. आथिला = योग्य झालेला, संपन्न असा. गर्विष्ठु–गर्वित = माजलेला, मदभाराचा, गाजलेला. भोगासक्तु–भोगासक्त = विषयभोग–उपभोग-आसक्तीचा. [क्रिया (योग) अंमलांत आणणें, पूजा, धर्मकृत्य, भूतांची क्रिया, उपचार, इलाज, साधन, उपाय.] (१०७). अपाय–अपावो = अनर्थ, दुःख, अपाय. तें सकळ हातिंचें–हें हातींचें सकळ = हातीं असलेलें, हातीं आलेलें, आश्रयाचें–मदतीचें झालेलें, पुराव्याचे तें. प्राप्तिहि–प्राप्तही = [प्राप्त = मिळविलेलें, अनुभविलेलें, आलेलें, उपस्थित, योग्य, असलेलें; भोगसुद्धां. प्राप्ति = मिळणें, पोंचणें, सांपडणें, मिळविणें, भेटणें, नफा, लाभ, पूर्वजन्मींच्या कर्माचें फळ, सफलता.] भोगू–भोगु. न लाहे–न लाभे = लागत नाहीं. (लाहे = लाहो करा, गांठ घाला, मूळबंधी) (१०८). गतायुष्य-गतायु = आयुष्य सरलेल्यास. [गतवयम् = प्रौढ, वृद्ध. आयुष्य = आयुष्यवर्धक. आयुस् = आयुष्य, जीवित, तूप. आयुषम् = आयुष्य. आयुर्दाय = आयुष्याचें प्रमाण. आयुर्द्रव्य = औषध. आयुस्तोम = आयुष्यवृद्धिस्तव यज्ञविशेष.] लक्ष्मी जैसी–न राहे लक्ष्मि = संपत्ति. निर्दैव = नातरी निर्दैवाच्या परिवरीं। लोह्या रुतलिया आहाती सहस्त्रवरी। परी तेथें बैसोनि उपवास करी। कां दरिद्रीं जियें ॥ ५९–९ ॥ चैतन्य = जीवात्मा, जीवित, जीव, प्राण, प्रकृति, मन, चित्त, ज्ञान, परमात्मा (१०९). स्वधर्म = नित्ययज्ञ, आत्मयज्ञ. जो–जरि. लोपला = हिरावून घेतला गेला. जाये जाय. थारा = आश्रय, आश्रयस्थान. (लोप = अभाव, अतिक्रमण, धर्म, जात, नाणें, इत्यादि; प्रचारांतून जाणें, मोडून जाणें, नाशणें, हिरावून नेणें. लुप्त = गोंधळणें, नष्ट होणें, कापणें, छेदणें, नाश करणें, लोप करणें, हिरावून नेणें) (११०).

आइका–आईका. प्रजाहि हो पुढें–प्रजा हो फुडें. निजवृत्ति = आत्मवृत्ति, नित्यवृत्ति. विरिंचि = ब्रह्मा (१११). म्हणोनि–म्हणउनि. स्वधर्म जो सांडील = नित्यकर्म, नित्ययज्ञ, आत्मयज्ञ सोडील. त्याचें–तयाचें. सर्वस्व = सर्व मालमत्ता, तत्त्वांश, सार; सर्वहित = मिरीं (११२). गिंवसूनि–गिंवसोनि = वेढून घेतात, शोधून वेढतील. समयीं–समईं. भंवतें = आसपास, सभोंवार, सर्वत्र, परिभ्रमें (११३). जितुकें–तितुकें. नानाविध पातकें = अनेक तऱ्हांचीं पापें. दैन्यजात = सर्व प्रकारचीं दुःखें; सर्व दुःखें (११४). उन्मत्त = वेडा, गर्विष्ठ, मस्त. प्राणिगण = जीवगण, प्राणीगण, समुदाय हो, प्राणिजाता वर्ग. प्राणिन् = बलिष्ठ, जीवंत. कल्पांतींहि = प्रलय झाला तरीही. रुदतां = रडले तरी, रडले असतां (११५). म्हणोनि–म्हणउनि. न–हे न. इंद्रियें बरळों नेदावीं = इंद्रियें स्वैर होऊं देऊं नयेत, वाटेल तशीं वागूं देऊं नयेत. निजवृत्ति = आत्मवृत्ति. प्रजेतें–प्रजातें. चतुरानन = ब्रह्मदेव, ब्रह्मा (११६). आणि तत्क्षणीं–मग तत्क्षणिं. स्वधर्म = आत्मयज्ञ, नित्ययज्ञ. तेणें पाडें विसंबो नये = त्याप्रमाणें, त्या आस्थेनें विसरूं नये (११७). आपुलाला–आपुलालिया. कर्म–कर्मीं. निरंतर–निरत = नेहमीं तत्पर. होआवें–व्हावें. पुढतपुढती = वारंवार, पुन्हा पुन्हा, वरचेवर (११८).

याप्रमाणें, सर्व सुखांसहित, मूर्तिमंत दैवच तुमचें देखा, तुम्हांस हुडकीत येईल— (१०१).

तुम्हीं सुखी, इच्छा पूर्ण झालेले होआल; जर का स्वधर्मामध्येंच कीं रत (अनुरक्त), तत्पर, संतुष्ट होऊन वर्तत राहाल तर कीं— (१०२)

सकल संपदा सहजसाध्य तेथें विषयाच्या स्वादास, लुब्ध होऊन इंद्रियमदास अनुसरेल जो— (१०३)

यज्ञानें समृद्ध झालेल्या देवांनीं जी ही संपत्ती पुरेपूर दिली आहे–(देहपुरुषासंबंधींची संपत्ति ती)–त्या स्वधर्म संपत्तीनें जो यज्ञेश्वराचें ठायीं भजेल नच— (१०४)

अग्नींत हवन, वैश्वदेव, देवपूजा नच करील, वेळेवर आलेल्यास–ब्राह्मणास–भोजन (अतिथिसेवा) जो नच देईल; (अग्नीच्या मुखांत हवन नच करील, तसेंच देवतेचें पूजन नच करील, प्राप्त वेळे म्हणजे यथाकाळ ब्राह्मणभोजन–अहो, ब्राह्मणच एक जेवीत–असें जें कांहीं भोजन करणें, जेवणें, असें जो नच करील.)—(१०५)

गुरुभक्तीस विमुख होईल, जो विरुद्ध–आयल्या वेळीं आलेल्यास–सहानुभूती, योग्य तो सन्मान नच करील, आपल्या जातीस सुख नच देईल; (गुरुभक्तीस विमुख होईल "जीवो गुरु" ह्या जीवदशेसच मुळीं गुरु म्हटलें. कारण काय, तर अहो–आणि माझें तंव आघवें प्रथन (प्रतिपादन) येणेंचि भावें । जें तुम्हांस कीं (तुम्ही संतीं) होआवें । सन्मुख सदा ॥ ३२९–१३ ॥ आघवियाचि दैवा । जन्मभूमि हे सेवा । जे ब्रह्म करी जीवा । शोच्यातेही ॥ ३७०–१३ ॥ तेथे प्रियाची परम सीमा । तो माऊली भेटे आत्मा । तये खेंवीं आटे डिंडिमा । सांसरिक हे ॥ ४४३–१६ ॥ याकारणें पैं बापा । जया आपली आथि कृपा । तेणें वेदांचिया निरोपा । आन न कीजे ॥ ४५५–१६ ॥ आचार्य उपास्ती–आचार्य उपासना, आचार्य = उपनयन करून वेद शिकविणारा उपाध्याय, पूज्य. आचचारः = वर्तन, सद्वर्तन, शिष्टाचार, चाल, रीत वर्तन, नियम, अक्ष. गुरुमुख–मोटकें गुरुमुखें उदेजत दिसे । आणि हृदयीं स्वयंभचि असे । प्रत्यक्ष नांदो लागे तैसें । आपेसया ॥ ४९–९ ॥ गुरु = बृहस्पति, सुराचार्य, गीपतिः, धिषणः, गुरुः, जीव, आंगीरस, वाचस्पति, चित्रशिखण्डिजः इति ९ बृहस्पते ॥ मरीच्यात्रिमुखा सप्तर्षयः चित्रशिखण्डि संज्ञा ॥ मुख शब्दात् पुलस्त्यादयः–"मरीचिरंगिरा अत्रिः पुलस्त्यः पुलहः क्रतुः । वसिष्ठश्चेति सप्तैते ज्ञेयः चित्रशिखण्डिनः ॥" विमुख म्हणजे तोंड फिरविलेला, विरुद्ध प्रतिकूल, रहित, परंपरेनें चालत आलेला जो कुलधर्म तेथें भक्तिभावें (चित्त) ठेवीत नाहीं, असा जो होईल; अतिथि अभ्यागत आले असता जो आदरातिथ्य नच करील; व आपल्या ज्ञाति बांधवांना संतोष जर नच देईल– (१०६)

जो केवळ भोगासक्त होईल; स्वधर्मक्रियारहित असा होईल; संपत्तीनें माजलेला जो होईल–(असा आपल्या धर्मामधील जो कांहीं क्रियायोग तो नच आचरील; आथिलेपणानें म्हणजे संपत्तिमदानें गर्विष्ठ होऊन आहे व फक्त विषयभोगासक्तीमध्येंच कीं केवळ जो आसक्त होऊन आहे– (१०७)

इतक्या गोष्टी करणार नाहीं, मग थोर हातीं आहे जें का–हातचें सर्वकांहीं नाहींसें होत राहील; मिळालेलें तेंही नच लाभेल–लाभाचें होईल; उपभोग ते भोग नच देणारे होतील. (त्यास मग थोर असा अपाय आहे–जें का, तेथें दुःखच एक का, अनर्थच एक गरिबी येऊन भयच वाहणें होणारें जें का; कारण काय, तर हें जें कांहीं सध्या हातीं आहे तें सर्वकांहीं नाहींसें होईल, जाईल; अहो असें पाहा कीं– (१०८)

गतायु शरीराचे ठिकाणीं चैतन्यानें वास्तव्य करणें नाहीं; निदैवी जो त्याचे घरीं लक्ष्मी कदाचित् वास्तव्य करणारी होते. (१०९)

स्वधर्म लोपला कीं, सुखाचा आश्रय मोडून जाऊन (मोडलाच समजावा) दुःखच एक पुढें होतें. दिव्याबरोबर प्रकाश हारपला जातो, नाहींसा होतो. (११०)

तशी जेथ निजवृत्ति–नित्य ब्रह्मवृत्ति–जेथें हरवते, सोडते तेथें स्वतंत्रतेची वस्ती–कदाचित् होणारी होते–वस्ती घडतच नाहीं; आणीक कांहीं सांगतो असें ब्रह्मदेव म्हणत आहे. (१११)

याकरितां समजून असा कीं, जो आपला स्वधर्म सांडील, सोडील. त्यास काल दंडण करील; व चोरच कीं एक असें त्यास म्हणून त्याचें सर्वस्व हरण करील. (११२)

सकल दोष भोंवतीं राहून त्यास वेढून घेतील–जशीं भुतें रात्रीं स्मशानास वेढून असतात. (११३)

त्याप्रमाणें त्रिभुवनींचीं दुःखें, तसें अनेकविधतेचीं पातकें, तसेंच दैन्यजात सर्व प्रकारचीं दुःखें–दैन्य तिथेंच कीं वसणारें–राहणारें होतें (११४)

अहो प्राणिगणहो! त्या उन्मत झालेल्याचे असें होतें व मग बाप्पा रडूं आलें, रडूं कोसळलें तरीही तें दुःख सर्वथा–कल्पांतींही–तें सुटत नाहीं. (११५)

म्हणून स्वधर्म म्हणजे निजवृत्ति सोडूं नये, टाकूं नये, सांडूं नये, इंद्रियें बरळों नेदावीं–इंद्रियें बहकूं देऊं नये–असें, याप्रमाणें चार तोंडांचा (ब्रह्मदेव) देव तो प्रजेस शिकवण देत आहे. (११६)

जलचरांना पाण्यानें–जलानें–सोडलें, जलचरांचें जल हरवलें तर तत्क्षणींच की मरणच एक मांडलें होतें, आकळतें, हें जसें; त्याप्रमाणें स्वधर्म विसंबावा नच! (११७)

—असें आहे म्हणून तुम्हीं समस्तांनीं आपआपल्या उचित कर्मामध्यें पुढतपुढती–पुन्हां पुन्हां–रत (अनुरक्त, तत्पर, संतुष्ट) होऊन असावें, असें प्रजातें चतुरानन म्हणत आहे—(११८)

**यज्ञशिष्टाशिनः सन्तो मुच्यन्ते सर्वकिल्बिषैः ।**
**भुञ्जते ते त्वघं पापा ये पचन्त्यात्मकारणात् ॥ १३ ॥**

[यज्ञशिष्ट = यज्ञांतून उरलेले–राहिलेले. (शिष्ट = उरलेलें, शिकवलेला, विद्वान्, सुशिक्षित, सुसंस्कृत, श्रेष्ठ, सभ्य.) आशिनः–आशितः = खाऊन संतुष्ट झालेले. संतः = सत्पुरुष, साधुपुरुष. सर्वकिल्बिषैः = सर्व पापांपासून; अपराधांपासून; रोगांपासून. मुच्यन्ते = मुक्त होतील; पापांनीं सोडले होतील. ये आत्मकारणात् पचन्ति = देहहेतु पुढें घेऊन अन्न शिजवितात. ते पापाः अघम् भुञ्जते = ते पापी पापच खातात.]

**अन्वय :** यज्ञशिष्टाशिनःसन्ताः सर्वकिल्बिषैः मुच्यन्ते । ते तु अघं भुञ्जते । ये पापाः आत्मकारणात् पचन्ति ।

**अर्थ :** यज्ञाच्या योगानें देवाला समर्पण करून राहिलेला अवशेष उपभोगणारे सज्जन सर्व पापांपासून मुक्त होतात. परंतु जे स्वतःकरितां केवळ स्वार्थबुद्धीनें अंतरंगांतील कारणधर्मरूपी अन्न शिजवितात, ते पातकी पातकच–पापच–भक्षण करितात.

**देखा विहित क्रियाविधी । निर्हेतुका (बुत्धी) बुद्धी ।**
**जो असतिये समृद्धी । विनियोग करी ॥ ११९ ॥**

**गुरु गोत्र अग्नि पूजी । अवसरें भजे द्विजीं ।**
**नैमित्तिकादिकीं पूजी । पितरोद्देशें ॥ १२० ॥**

**या यज्ञक्रिया उचिता । यज्ञेंसीं हवन करितां ।**
**हुतशेष स्वभावता । उरे जें जें ॥ १२१ ॥**

**तें सुखें आपुलां घरीं । कुटुंबेसीं भोजन करी ।**
**तें भाग्यचि निवारी । कल्मषातें ॥ १२२ ॥**

**तें यज्ञावशिष्ट भोगी । म्हणोनि तो सांडिजे अघीं ।**
**जयापरी महारोगी । अमृतसिद्धी ॥ १२३ ॥**

**कीं तत्त्वनिष्ठ जैसा । नागवे ना भ्रांतिलेशा ।**
**तो शेष भोगी तैसा । नाकळे दोषां ॥ १२४ ॥**

**म्हणोनि स्वधर्में जें अर्जे । तें स्वकर्मेंचि विनियोगिजे ।**
**मग उरे तें भोगिजे । संतोषेंसीं ॥ १२५ ॥**

हेंवांचुनियां पार्था । राहाटों नये सर्वथा ।
ऐसी आद्य हे कथा । श्रीमुरारी सांगे ॥ १२६ ॥

जे देहचि आपणपें मानिती । आणि विषयातें भोग्य म्हणती ।
ययापरातें न स्मरती । आणिक कांहीं ॥ १२७ ॥

हें यज्ञोपकरणें सकळ । नेणत सांते बरळ ।
अहंबुद्धि केवळ । भोगूं पाहती ॥ १२८ ॥

इंद्रियरुचीसारिखें । पाक करविती निकें ।
ते पापिये पातकें । सेविती जाणा ॥ १२९ ॥

हें संपत्तिजात आघवें । हवनद्रव्य मानावें ।
मग स्वधर्मे यज्ञें अर्पावें । आदिपुरुषीं ॥ १३० ॥

हें सांडुनियां मूर्ख । आपणपेयालागीं देख ।
निपजविती पाक । नानाविध ॥ १३१ ॥

जिहीं यज्ञ सिद्धी जाये । परेशा तोषु होये ।
तें सामान्य अन्न नोहे । म्हणोनि गा ॥ १३२ ॥

हें न म्हणावें साधारण । अन्न ब्रह्मरूप जाण ।
जें जीवन हेतुकारण । विश्वा इया ॥ १३३ ॥

विहित = शास्त्रोक्त. क्रियाविधी = कर्माचरण, कर्मानुष्ठान. निर्हेतुक = निरिच्छतेनें, निष्काम बुद्धीनें. असतिये समृद्धी = यथाशक्ति. विनियोग = खर्च, उपयोग; चित्तैकाग्र्य करतो [ विहित क्रियाविधी–क्रियायोगः = तपस्वाध्यायेश्वर प्रणिधानानि क्रियायोगः । तप, अभ्यास आणि कर्मफळ यांचें परमेश्वराला समर्पण करणें त्यास 'क्रियायोग' म्हणतात. पूर्वोक्त विधि हे क्लेश कमी होण्याकरितां आणि समाधि सिद्ध करण्याकरितां आहेत.] (११९). अग्नि = अग्नी. अवसरें–अवसरीं = यथाकाळीं. नैमित्तिकादिकीं पूजी–निमित्तादिकीं यजी = श्राद्धपक्षादि प्रसंगीं; पर्वकाळीं. पितरोद्देशें = पितराच्या हेतूनें–करारानें (१२०). यज्ञेंसीं–यज्ञेंशीं–हवन करितो = यज्ञांत–यज्ञानें हवन करणें जें, यज्ञांत आहुति टाकणें जें–होम करणें जें. यज्ञक्रिया उचिता = स्वधर्म नित्ययज्ञानें उचित अशा. हुतशेष = यज्ञाच्या हवनद्रव्यामधील अवशेष (१२१). आपुला–आपुलें भाग्यचि निवारी–कीं भाग्यचि ते निवारी. कल्मषातें = स्वधर्माचरणानें पंचमहायज्ञ करून जें शेष उरेल तें सेविल्यानें सकळ पातकांचा नाश होतो–पापापासून निवारण होतें (१२२).

तो सांडिजे अघीं–सांडिजे तो अघीं = पाप त्याला सोडून जातें; तो पापांपासून बचावतो. यज्ञावशिष्ट भोगी = यज्ञशेष सेवन करतो म्हणून पातकापासून बचावतो–तो मुक्त होतो. महारोगी अमृतसिद्धी (सेवनीं) = महा आजारी अमृतसेवन केल्यानें (पापा) रोगापासून मुक्त होतो (१२३). तत्त्वनिष्ठ = ब्रह्मनिष्ठ. नागवे ना–नागवे–भ्रांतिलेशा = भ्रांतींत सांपडत नाहीं; भ्रमांत पडत नाहीं. शेष = यज्ञावशिष्ट, यज्ञावशेष. भोगी = उपभोगी. नाकळे = आकळिला जात नाहीं (१२४). स्वधर्मे जें अर्जे = नित्ययज्ञानें जें मिळविलें जातें; जी प्राप्ती होते; जो लाभ होतो. स्वकर्मेंचि–स्वधर्मेंचि संतोषें = तृप्तीनें. विनियोगिजे = सत् शब्द सत्तेचें रूप (३८०–१७). विनियोग मोक्षाचे सोपे (३५४–३६५–१७) (१२५.) हेंवांचुनियां–हें वांचूनि = असें हें ओंवी १२५ मध्यें सांगितलेलें जें तें केल्याशिवाय राहूं नये–तें करावेंच करावें. आद्य हे कथा = अशी ही आदि कथा, श्रेष्ठ, मूळची, पहिली; विष्णुदेवतेची प्रारंभींची ती कथा. (कंथा = गोधडी. कथा = प्रबंधस्य, वाक्यविस्तारस्य.

या कल्पना, रचना सा कथा नाटक रामायणादिः।). सर्वथा-अन्यथा (सर्वथा = सर्वप्रकारें खात्रीनें, एकंदरीत, पूर्णपणें. अन्यथा = दुसऱ्या, निराळ्या रीतीनें, एरव्हीं, खोटेपणानें, चुकीनें, दुसऱ्या कारणानें. अन्यथा कृ = बदलणें, विरुद्ध जाणें, उल्लंघणें, नाश करणें, होऊं न देणें, खोटा करणें. श्रीमुरारी = बकासुराचा अनुयायीविशेष. त्यास कृष्णानें मारिलें म्हणून त्यास मुरारी, मुरद्विष अशीं नांवें पडलीं (१२६).

म्हणती-म्हणति. ययापरातें-यापरतें = त्यापलीकडे. स्मरती-स्मरति. विषयातें भोग्य म्हणती = [भोग = प्रारब्ध. भोग्य = भोगण्यास योग्य. (भोज्य वि. भोग्य) भोगण्याचें-वेश्या भोगादि वस्तु, द्रव्य, धान्य, नाट्यसंगीतादींचा खर्च.] विषय = ज्ञानेंद्रियाचा विषय [रूप, रस, गंध, स्पर्श, शब्द, व्यवहार, प्रपंचसुख.] विषयिन् = इंद्रिय, मदन, विषयासक्त, राजा. विषयासक्तिसच भोगण्यास योग्य म्हणतात. ययापरातें = त्यापरतें-पलीकडचें. परा = चौथ्या वाणीचें नांव. पराभक्ति = श्रेष्ठ भक्ति. (पराश्रम = उपद्रवापलीकडील ठिकाण.)-स्मरणाचें, प्रीतीचें, मदनाचें करीत नाहींत. स्मरणं = अलंकारविशेष. स्मृ = मनांत आणणें, स्मरण चिंतन करणें, मानणें; उत्कंठा-दुःखपूर्वक स्मरण करणें, आठवण देणें. ययापरातें न स्मरती = आणीक कांहीं त्या परावाणीस का श्रेष्ठ भक्तीस मानीत नाहींत-मनांत आणीत नाहींत, का दुसरे कांहीं आणीक नच चिंतितात (१२७). यज्ञोपकरणें-यज्ञोपकरण = यज्ञासंबंधीं-यज्ञाकरितां साहित्य, द्रव्य, सामुग्री (उपकरण). सकळ = सर्व. नेणत सांते बरळ = नेणून, अज्ञ होऊन, भ्रांतपणें, न समजतां. अहंबुद्धि = अहंकारास. केवळ भोगूं पाहती = देहाशीं तादात्म्य पावून, निश्चित होऊन. विषयोपभोगच भोगणेंच एक पाहतात, इच्छितात. केवळ = निर्णिते निश्चिते केवलम् (एकस्मिन्कृत्स्नेच केवलम् त्रिषु।) (१२८).

पाक करविती निके-करविती पाक निकें = चांगला, उत्तम, खरा स्वयंपाक-पक्वान्नें करवितात. पाक = स्थाली इत्यादि भांडें; बालक; असुरविशेष. पचा पाकः इति २ पचनस्य। जाणा-जाण = समजा, उमजा. इंद्रियरुचीसारिखें = ज्ञानाचें किंवा कर्माचें साधन (हातपाय, डोळे, इत्यादि)-मन मनाची चव (भूक, इच्छा, स्पृहा, तल्लीनता, शोभा, सौंदर्य) मागेल तें. ते पापिये पातकें सेविती = ते पापी पातकच सेवितात-भक्षितात. पाकु-पाकुल = आचारी. पाकयजं = बागडखार. पाक = पचन, पक्वता, भाजणें, विकास, संपादणी; परिणाम, धान्य, फल देणारा, केस पिकणें, स्वयंपाक, जठराग्नि (१२९). स्वधर्मे यज्ञें-स्वधर्मयज्ञें. संपत्तिजात आघवें हवनद्रव्य मानावें. आदिपुरुष = विष्णु, कृष्ण (परमेश्वर या अर्थी) (१३०). सांडुनियां-सांडोनियां = त्यागून. आपणपेयालागीं = आपणा स्वतःकरितां. निपजविती-पाक = पक्वान्नें. नानाविध = अनेक तऱ्हांचीं-पाक-पक्वान्नें उत्पन्न करितात (१३१).

परेश-परेशा = परमेश्वराला. तोष होये = संतोष-तुष्टि होते. तें सामान्य अन्न नोहे-तें हें सामान्य अन्न न होये = ज्या अन्नादिकांनीं यज्ञ पूर्ण होतो-परमेश्वर संतोषित होतो-देहपोषण म्हणून तें अन्न साधारण नव्हें. म्हणोनि गा-म्हणोनियां (१३२). जें जीवन-हें जीवन = जीवन = सजीव करणारा वायु, सूर्यपुत्र, परमात्मा, प्राण, अन्न, दूध. विश्वा इया-विश्वा यया = स्थूल देहाभिमानी जीवाला, जगाला, जगताला त्या. विश्व = आदित्य विश्व वसवः ९, गणदेवता, अशेष सर्व, नागरसभ्य, अशेष, निखिले, अखिल. हें न म्हणावें साधारण = सामान्य गुणांचें का सामान्य नियमांचें-अनेकांचें सामाईक असें न म्हणावें-सर्वोपयोगी. अन्न ब्रह्मरूप जाण = ब्रह्मस्वरूप-रूप-जाण (१३३).

जाण, पाहा कीं (विहित) शास्त्रानें सांगितलेलें कर्माचरण-क्रियाविध, निर्हेतुक-निरिच्छ बुद्धीनें जो अमतिये समृद्धि यथाशक्ति विनियोगाचें, उपयोगाचें करतो, खर्च करतो- (११९)

गुरु गोत्र, अग्निपूजा, अवसरीं-यथाकाळीं द्विजांना भजतो, श्राद्ध पक्षादि प्रसंगें-पितराच्या उद्देशानें-द्विजांचें यजन याजन करतो-[विप्र इति उपलक्षम् क्षत्र वैश्ययोः। अण्डजाः पक्षिणः। एते द्विजाः (अमरकोश)] (१२०).

उचित-योग्य, नेहमींचें-स्वाभाविक अशा ह्या यज्ञक्रिया, यज्ञानें यज्ञ अग्नींत हवन केल्यावर मग जें जें कांहीं हुताशेष (हवनद्रव्यांतील अवशेष) उरेल-(१२१)

-तें आपल्या घरीं सुखानें कुटुंबास भोजनाचें करावें; व असें केल्यानें भाग्यच एक पदरांत पडून (भोग्य) कल्मष, पाप तें नाहींसें होतें. स्वधर्माचरणानें पंचमहायज्ञ करून जें शेष उरेल तें सेविल्यानें सकळ पातकांचा नाश होतो. (१२२)

तो तें यज्ञाचें अवशिष्ट सेवन करणारा, उपभोगणारा म्हणून त्याजपासून अघ, पाप, दुःख पळून जातें. ज्याप्रमाणें अमृतसेवनानें-अमृतसिद्धीनें महारोग सांडला होतो जसा. (१२३)

तत्त्वनिष्ठ, ब्रह्मनिष्ठ जसा भ्रांतींत मुळींच सांपडत नाहीं, तसा तो यज्ञावशेष भोगणारा दोषांनीं का दोषामध्यें आकळला जात नाहीं-सांपडला होत नाहीं-आकर्षिला जात नाहीं. (१२४)

म्हणून स्वधर्मानें जें अर्जे म्हणजे मिळविलें जातें त्याचा स्वधर्मानेंच विनियोग करावा व मग जें कांहीं उरेल तें संतोषानें, समत्वानें, आनंदानें भोगावें-उपभोगावें. (१२५)

अशा या यज्ञावशेष भोजनाशिवाय अन्यथा दुसऱ्या कशाही तऱ्हेनें राहाटण्याचें करूं नये, अशी ही आद्य कथारचना श्रीमुरारी सांगत आहेत. (१२६)

जें आपणा स्वतःस देहच एक मानतात व विषयांना सर्वथैव भोग्य, उपभोग, सेवन म्हणतात. याशिवाय जे दुसरें कांहींही आठवीत-स्मरत नाहींत-(१२७)

हें यज्ञोपकरण सर्व द्रव्य, यज्ञार्थ मिळालेली सामग्री-साहित्य आहे असें न समजता भ्रांत अहं बुद्धि पुरुष अहंकारानें देहाशीं तादात्म्य पावून विषयभोग इच्छितात. (१२८)

इंद्रियांच्या रुचीसारखें-इंद्रियांच्या रुचीस आवडणारीं चांगलीं उत्तोत्तम पक्वानें करतात, असे ते पापिये पापच सेवन करतात; ते पापी पातक सेवितात. (१२९)

हें संपत्तिजात आघवें हें अवघें सर्व-सर्व वस्तु जीवनोपयोगी-असें सुखावह तें हवनद्रव्य-होमद्रव्य-तें स्वधर्मरूप होमाचें समजावें, मानावें व मग स्वधर्मरूपी यज्ञानेंच आदिपुरुषीं म्हणजे सकळ विश्वाचा भोक्ता-भर्ता-त्याचे ठायीं, त्यास अर्पण करावें. (१३०)

आदि पुरुषाचे ठायीं स्वधर्मरूपी यज्ञानें भोग अर्पावेत. ते न करितां मूर्ख ते तर आपणा स्वतःकरितां पाहा कीं अनेक तऱ्हेचे पाक-पक्वान्नें-करितात, निपजवितात कीं! (१३१)

जिहीं यज्ञ सिद्धी जाये-ज्या अन्नादिकांनीं यज्ञ पूर्ण होतो-परेशा तोषु होये-परमेश्वर संतोषित होतो आणि म्हणून असें तें देहपोषक साधारण अन्न नव्हें कीं- (१३२)

हें कांहीं साधारण समजूं नये; त्या अन्नाला सामान्य समजूं नये. कारण तें अन्न ब्रह्मरूप जाण. तें प्रत्यक्ष ब्रह्मरूपच होय. हें जीवनहेतु म्हणजे हेंच जगांतील सर्व प्राण्यांस जगण्यास कारण कीं-(अन्नाला साधारण समजूं नये. तें प्रत्यक्ष ब्रह्मस्वरूप होय. तें जगांतील सर्व प्राण्यांस जगण्यास कारण होतें म्हणून.) (१३३)

**अन्नाद्भवन्ति भूतानि पर्जन्यादन्नसंभवः ।**
**यज्ञाद्भवति पर्जन्यो यज्ञः कर्मसमुद्भवः ॥ १४ ॥**

[ भूतानि अन्नात् भवन्ति = भूतें अन्नापासून होतात. अन्नसंभवः पर्जन्यात् (भवति) = अन्नसंभव-जन्म-पर्जन्यापासूनच कीं. पर्जन्यः यज्ञात् भवति = यज्ञामुळें पर्जन्य होतो. कर्मसमुद्भवः यज्ञः = कर्मांचा समुद्भव (कर्मांची उत्पत्ति) म्हणजेच यज्ञ. ]

**अन्वय :** भूतानि अन्नात् भवन्ति। अन्नसंभवः पर्जन्यात्। पर्जन्यः यज्ञात् भवति। कर्मसमुद्भवः यज्ञः।

**अर्थ :** अन्नापासून प्राणी उत्पन्न होतात. पर्जन्यापासून अन्न (खाद्य पेय पदार्थ) उत्पन्न होतें. यज्ञामुळें पर्जन्यवृष्टि होते. यज्ञ कर्मानें संपादन होतो (१४).

**अन्नास्तव भूतें। प्ररोह पावती समस्तें।**
**मग पर्जन्य या अन्नातें। सर्वत्र प्रसवे ॥ १३४ ॥**

**तया पर्जन्या यज्ञीं जन्म। यज्ञातें प्रकटी कर्म।**
**कर्मासि आदि ब्रह्म। वेदरूप ॥ १३५ ॥**

अन्नास्तव = अन्न स्तविलें तींच भूतें होत. प्राण रक्षण करणारीं अन्नें तीं भूतांना उत्पन्न करतात. स्तवः। स्तावः। स्तवनम् = स्तुति, प्रशंसा. (स्तवक–स्तबक = ग्रंथभाग, गुच्छ, झुबका). प्ररोह (सह्+प्र = अंकुर येणें, उगवणें, वाढणें, वाढ होणें, चढणें, पोहोंचणें, स्थितीप्रत जाणें, झाड लावणें, रोंवणें, वर चढविणें, देणें, अर्पणें. भूतें–भूत = सिद्धीस गेलेले, झालेले, खरें, सत्त्व, वास्तविक, योग्य, न्याग्य, योगींद्र, वस्तु, पदार्थ, प्राणी, जीव, स्थूल पंचमहाभूतें, सत्य गोष्ट, कल्याण, इत्यादि. भूतें वाढीचीं झाल्यानें–महती पावल्यानें–तीं आकाशामध्येंच कीं महत्त्व पावून–मेघासच येणारीं झाल्यानें–तेथें पर्जन्य अन्नास प्रसवतो. पर्जन्याचा प्रभाव सर्वांठायीं–सर्वत्र अन्नासच प्रसविण्याचें करतो. पर्जन्यवृष्टीमुळें अन्नें हीं प्रसवतात–उद्भवतात, उपजतात.

भूतादि = अहंकार तत्त्व. भूतात्मा = जीवात्मा, ब्रह्मा, विष्णु, महेश, शरीर, युद्ध, भांडण. भूतदृष्टा = कृष्ण चतुर्दशी. भूतेश = शंकर. भूतकर्तृ = ब्रह्म, जगत् कारण. भूतकृत् = ब्रह्मदेव. भूतक्रांति = भूतसंचार. भूत चतुर्दशी = आश्विन चतुर्दशी. भूतपूर्व = पूर्वीचें. भूतभावन = विष्णु. भूतयज्ञ = भूतमात्रांस अन्नांश देणें. (पंचमहायज्ञांपैकीं एक). भूतभृत = प्राणिमात्रांना धारण करणारा. भूतविक्रया = अपस्मार, पिशाच्चबाधा. भूतचिंतक = स्वभाववादी. भूतवेशी = निर्गुडी. भूतवृक्षः – भूतवासः = बेहडा, भूत आवास. भूतपत्री–भूतप्रिया = काळी तुळस. भूतघ्न = लसूण, उंट, भूर्जवृक्ष. भूतकेश–भूतकेशी = निर्गुडी, पांढरी तुळस, जटापांसी. भूतघ्नी = तुळस. भूत = अफू, पारा, योग्यपणा, कल्याण, नागरमोथा—"तैं नित्ययागसहितें। सृजिलीं भूतें समस्तें। परी नेणतीच्चि तिये यज्ञातें। सूक्ष्म म्हणोनि ॥ ८६–३ ॥ भूतें सूक्ष्म म्हणून त्या यज्ञांस जाणत नाहींत, नित्य यज्ञयागासहितच कीं तीं भूतें जरी सृजिलीं–उत्पन्न झालेलीं, केलेलीं, तरीसुद्धां. सूक्ष्म = सूक्ष्मम्, श्लक्ष्णम्, दभ्रम्, कृशम्, तनु, मात्रा, त्रुटि, लव, लेश, कण, अणु इति ११ सूक्ष्मस्य। (अमर) अध्यात्मं आत्मन्यधिकृतं, लिंगदेहम् अपि शब्दात् कतवे सूक्ष्मम्। प्रसव = सू+प्र = वृद्धि पावणें (जन्म देणें, उत्पन्न होणें, मिळणें). प्रसुति प्रसवः इति २ गर्भ विमोचनस्य–(अमर) उत्पादे, उत्पत्तौ, गर्भमोचने, प्रसूतौ, फले, पुष्पे च प्रसवः।– मत्स्यप्रसव शृंगी–सप्तशृंग पर्वतावर मत्स्यापासून झालेला मत्स्येन्द्र ॥ १७५४ ॥ अ. १८ वा॥ शाखा नाना व्हाळया प्रसवतु ॥ १५० ॥ अ. १५ वा ॥ अध्याय अध्यायाते प्रसवे ॥ ७५ ॥ अ. १८ वा ॥ बीज शाखातें प्रसवे॥ २९२ ॥ अ. ९ वा ॥ सर्वत्र पर्जन्य प्रसवे अन्न–अन्नास्तव = अन्नापासून. प्ररोह = वृद्धि, वाढ. प्रसवे = निपजवितो, तयार करणें, घडविणें, घडणें, करणें, उत्पन्न होणें (१३४).

आदिब्रह्म = आदि = आरंभ, मूळ, उगम. आदीसि जे आदि ॥ ९५ ॥ अ. २ रा ॥ १५४ अ. २ रा। आदिपुरुष = विष्णु, कृष्ण. आदिभव = ब्रह्मा, विष्णु, वडील भाऊ. आदिभूत = सूक्ष्म पंचमहाभूतें. आदिशक्ति = माया, दुर्गा. आदिशरीर = अज्ञान, लिंगदेह. आदिदेव = परमात्मा, विष्णु, शंकर, सूर्य, ब्रह्मदेव. ब्रह्म = मूळ तत्त्व, अध्यात्मज्ञान, उपनिषद, स्वरूपज्ञान, तप, ब्राह्मण, ब्राह्मणजाति, तेज, ब्रह्म, वेद, स्तोत्र, बृहस्पति, विष्णु, ब्रह्मदेव, ब्रह्मलोक, ब्रह्मज्ञानी. ब्रह्मसू = अनिरुद्ध. मेखल = मुंजतृण. वेदरूप = कर्मास तर तूं

आदिलाहि, आदिहूनहि आदी असें जें ब्रह्म, वेदरूप जो. वेदरूपास आल्यानें जें ब्रह्म नामास येतें. वेद = ज्ञान, ऋग्वेद, यजुर्वेद, सामवेद, अथर्ववेद आणि ब्राह्मण ग्रंथ, ३ वेदे कर्मकांडः। स्मृति, वृत्त, विवरण, टीका. वेदांग = शिक्षा, कल्प, व्याकरण, छंदस्, ज्योतिष्, निरुक्त–प्रत्येकीं वेदांग म्हटलें. वेद आदिवर्ण = ॐ हें अक्षर. वेदमातृ = गायत्री मंत्र–गायत्री, सावित्री, सरस्वति. वेदवदन = व्याकरण. वेदवादः = कर्मकांड. वेदव्यास = व्यासऋषी (१३५).

अन्नामुळेंच समस्त भूतें वाढ पावतात, पोसिलीं होतात व मग पर्जन्य झाल्यानें–पर्जन्यास–पाऊसास व अन्नास सर्व ठिकाणीं उत्पन्न करतो. (१३४)

त्या पर्जन्याची उत्पत्ति यज्ञापासून (विष्णु, सूर्य) होते. यज्ञास कर्म प्रगट करतें. कर्माला मूळ कारण–वेदविधीप्रमाणें कर्में होतात म्हणून आदिब्रह्म वेदच रूप कारण जाण. [पावसाची उत्पत्ति यज्ञापासून (विष्णु, सूर्य)]–यज्ञास कर्म प्रगट करतें–कर्माला मूळ कारण वेदच–वेदविधीप्रमाणेंच कर्में होतात.) (१३५)

**कर्म ब्रह्मोद्भवं विद्धि ब्रह्माक्षरसमुद्भवम् ।**
**तस्मात्सर्वगतं ब्रह्म नित्यं यज्ञे प्रतिष्ठितम् ॥ १५ ॥**

[उद्भवः = उत्पत्ति, हेतु, उत्पत्ति, जन्म. विद् = जाणणें, मानणें, अनुभवणें. विध् = भोंक पाडणें, वेंधणें, बनविणें, पूजा करणें, सत्कार करणें. समुद्भव–उद्भवसम् = सम् = तेंच, तुल्य, प्रमाणें, सदृश, सपाट, सरळ, निःपक्षपाती, प्रामाणिक, सद्गुणी, सामान्य, मध्यम, योग्य, संपूर्ण, सर्व, सपाट मैदान, ताल सम, दोहोनें निःशेष भागली जाणारी संख्या, सह, एकत्र, तुल्यतेनें, एक काळ. समकोल = साप. समपद = तिरंदाजाचें सारखे पाय ठेवणें. समवर्ति = निःपक्षपाती, यम. समस्थळी = अंतर्वेदी देश. सर्वग = परमात्मा, पाणी. प्रतिष्ठितम् = स्थापना होणें, मावळणें, पक्कें बसणारें, देणें, अर्पणें.]

**अन्वय :** ब्रह्म अक्षर समुद्भवं विद्धि। कर्म ब्रह्म उद्भवं विद्धि। तस्मात्। यज्ञे। नित्यं सर्वगतं ब्रह्म प्रतिष्ठितम्।

**अर्थ :** कर्म, ब्राह्मणापासून परमेश्वराचे इच्छेनें उत्पन्न होतें आणि परमेश्वर अक्षर नित्यतत्त्वापासून–सच्चिदानंद स्वरूपापासून–प्रगट होतें. यावरून सर्वव्यापी परमेश्वरी तत्त्व यज्ञामध्यें उपास्य देवतारूपानें नेहमीं असतें, असें समज (१५).

**मग वेदांतें परात्पर । प्रसवतसे अक्षर ।**
**म्हणोनि हें चराचर । ब्रह्मबद्ध ॥ १३६ ॥**
**परि कर्माचिया आर्ती । यज्ञें अधिवास श्रुति ।**
**ऐकें सुभद्रापति । अखंड गा ॥ १३७ ॥**

परात्पर = सर्वोत्तम, ईश्वर, परमेष्टि गुरूचाहि गुरु. अक्षर = अविनाशी ब्रह्म. म्हणोनि–म्हणउनि. चराचर = सर्व वस्तु, जग, आकाश, स्वर्ग. ब्रह्मबद्ध = ब्रह्माचे आधीन (१३६). आर्ती–मूर्ति. यज्ञें–यज्ञीं. श्रुति = वेदवाक्य, भाषण, वाणी, श्रवणेंद्रिय, ऐकणें, कान, ध्वनि, संहिता, विद्या, स्वरावयव, श्रवण (१३७).

(पर्जन्यजन्म यज्ञानें–यज्ञास कर्म प्रगट करतें–कर्मास वेदरूप आदिब्रह्म तें)–व यावर मग वेदास (परापर, परावर) परात्पर, अविनाशी ब्रह्म तें अक्षर प्रसवतें; आणि म्हणून या कारणास्तव हें चराचर ब्रह्म-बद्ध असें ब्रह्माधीन व ब्रह्मापासून झालेलें आहे. (१३६)

हे सुभद्रापति, ऐक कीं–कर्ममूर्तीरूपी जो यज्ञ त्यांत अखंड श्रुतीचा अधिवास आहे. (१३७).

**एवं प्रवर्तितं चक्रं नानुवर्तयतीह यः ।**
**अघायुरिन्द्रियारामो मोघं पार्थ स जीवति ॥ १६ ॥**

[वृत्+प्र=प्रवृत्त झालेलें, निर्वाहाचें केलेलें, उद्भवलेलें, घडलेलें, सुरू झालेलें, आरंभ केलेलें. चक्र= अधिकार, आज्ञा, सूर्यमंडळ, सुदर्शन, आज्ञाचक्र, शरीरांतील हृदय इत्यादि ठिकाणचें चक्र. चक्रांग = हंस. चक्रअधिवासिन् = नारिंग. चक्रपाल = चक्रधर, सेनापति, क्षितिज, वर्तुळ. वृत्+अनु = अनुसरणें, मागून जाणें, सेवा करणें, वळणावर जाणें, संतुष्ट करणें, चालू ठेवणें, शब्द इत्यादि पुढल्या नियमांत येणें. अघ+ आयुस् = (अघ = पापी, दुष्ट, पातकी, पाप, पीडा, छळ, अपराध, संकट, उपद्रव, अशौच, दुःख, पापाची देवता, ज्योतिषामधील मघा नक्षत्र. आयुस्=आयुष्य, जीवित, तूप). मोघं = व्यर्थ, निरुपयोगी, अनिश्चित, टाकलेला. मोघ पुष्पा = वांझ स्त्री, कुंपण, वावडिंग, पाडाळी. इंद्रिय आरामः = विषयासक्त.]

**अन्वय :** एवं प्रवर्तितं चक्रं, पार्थ न अनुवर्तयति इह यः इंद्रिय आरामः अघायु स मोघं जीवति ।

**अर्थ :** हे अनघा पार्था–निष्पापा ! याप्रमाणें परमेश्वरानें सुरू केलेलें यज्ञचक्र–जीवनक्रम, जीविततत्त्व– जो ह्या लोकीं जिवंत असून पुढें चालवीत नाहीं, त्या तत्त्वाच्या अनुभवानें असत नाहीं, तो इंद्रियांच्या आयुष्याचें क्रीडास्थान होऊन व्यर्थ जगतो (१६).

**ऐसी हे आदिपरंपरा । संक्षेप तुज धनुर्धरा ।**
**सांगीतली या अध्वरा । लागोनियां ॥ १३८ ॥**

**म्हणोनि समूळ हा उचितु । स्वधर्मरूप क्रतु ।**
**अनुष्ठितां मातु । लोकीं ईये ॥ १३९ ॥**

**तो पातकांचा राशी । जाण भार भूमीसी ।**
**जो कुकर्मे इंद्रियांसी । उपयोगा गेला ॥ १४० ॥**

**त्याचि जन्मकर्मे सकळ । अर्जुना अति निर्फळ ।**
**जैसें कीं अभ्रपटळ । अकाळींचें ॥ १४१ ॥**

**कीं गळस्तन अजेचें । तैसें जियालें देख तयाचें ।**
**जया अनुष्ठान स्वधर्माचें । घडेचिना ॥ १४२ ॥**

**म्हणोनि ऐकें पांडवा । हा स्वधर्म कवणें न सांडावा ।**
**सर्वभावें भजावा । हाचि एक ॥ १४३ ॥**

**हां गा शरीर जऱ्ही जालें । तरी कर्तव्य वोघेंचि आलें ।**
**मग उचित कीं आपलें । वोसंडावें ॥ १४४ ॥**

**तरी परिस पां सव्यसाची । मूर्ति लाहोनि देहाची ।**
**खंती करिती कर्माची । ते गांवढे गा ॥ १४५ ॥**

लागोनियां–लागूनियां = परंपरा, मालिका (परंपरा–अन्नापासून भूतें–प्राणिमात्र, पर्जन्यापासून अन्न, यज्ञापासून पर्जन्य, कर्मापासून यज्ञ, वेदापासून कर्म आणि 'यज्ञ' (ब्रह्म)-पासून वेद असें हें चक्र चाललें आहे. कर्माचें मूळ यज्ञ–तो यज्ञ श्रुतीचें ठिकाणीं राहतो.) सांगीतली–सांगितली. संक्षेप=थोडक्यांत आणून, संक्षिप्तपणानें, सारांश [(अपहार, संहार)–(जगदुत्पत्तीपासूनचा चालू क्रम थोडक्यांत स्वधर्मरूप यज्ञासंबंधीं

सांगितला)]. अध्वरा = यज्ञ (१३८). म्हणोनि–म्हणून. अनुष्ठितां मातु–नानुष्ठी जो मत्तु. अनुष्ठान = करणें, संपादणी, अनुसरणें, आरंभ, वर्तन, क्रिया, धर्मकृत्य करणें, धर्मकृत्य आचरणें. मत्तु = उन्मत्त. लोकीं इये–लोकीं की इये. लोकीं = भूमंडळीं. क्रतु = यज्ञ (यज्ञः, सवः, अध्वर, याग, सप्ततन्तु, मरण, क्रतु इति ७ यज्ञस्य।) मातु = नावलौकिक. (मातिः = माप, प्रमाण, बिनचूक ज्ञान. लोकसंग्रह = जगाचें धारण पोषण, लोककल्याण)–आख्या, अभिमान, नामधेय, नाम (१३९). उपयोगा गेला–उपेगा गेला = कामास आला. कुकर्मे = वाईट कर्मानीं. कु = पृथ्वी, त्रिकोणाचा पाया. कुपथ्य = अपायकारक. कुवाद = निंदक, नीच. कुकर = दुर्वर्तनी, चोर (१४०). त्याचि जन्मकर्मे सकळ–ते जन्मकर्म सकळ = त्यांनीं ह्या जन्मकर्मातील फळें. निर्फळ–निष्फळ–(निष्फळ = क्षीण, जीर्ण, निरवयव, निरुपाधिक. कीं–कि अभ्रपटल अकाळींचें = अकाळीं–अवेळीं येणारे ढग (१४१). गळस्तन–गळा स्तन–अजेचें गळस्तन = शेळीच्या गळयाचें स्तन. देख–देखे. जियालें = जीवित, जिणें. अनुष्ठान = आरंभ, संपादणी, धर्मकृत्य आचरण (१४२). सांडावा–संडावा. एक–येक. स्वधर्म = नित्ययज्ञ. सर्वभावें भजावा = सर्व उपासनेचें स्वरूपच एक (१४३). जालें–जाहलें. वोघेंचि–वोघें–ओघाओघानेंच. कीं आपलें–कां आपलें. वोसंडावें = टाकावें, त्यजावें, सोडावें (१४४). तरी परिस–परिस = ऐक. सव्यसाचि = उभौ मे दक्षिणौपाणी गांडीवस्य विकर्षणे। तेन देवमनुष्येषु सव्यसाचिति मां विदुः॥ = दोन्ही हातांनीं बाण सोडणारा. मूर्ति लाहोनि देहाची = देह आकार मूर्ति प्राप्त होऊनही. खंती = काळजी, चिंता. गांवढे = अडाणी (१४५).

स्वधर्मरूप यज्ञास–अध्वरा लागोनियां–अशी ही आदि परंपरा–मालिका, जगदुत्पत्तीपासूनचा चालू क्रम–तुजला हे धनुर्धरा, थोडक्यांत–संक्षेपतः – सांगितली. (१३८)

या कारणास्तव उचित–योग्य–असा हा सकळ स्वधर्मरूप यज्ञ–क्रतु–जो इंद्रियांच्या सेवेंतच ज्याच्या आयुष्याचा नाश झाला असा मत्त–मदयुक्त, मस्त, उन्मत्त–ह्या लोकीं अनुष्ठानाचा करीत नाहीं, भक्तीचा करीत नाहीं–(लोक = व्यवहार, प्रकाश, विषय, फलाभोग्य वस्तु, विश्वलोक, समुदाय, पाहणें, प्रकाशणें, मानणें.) (१३९)

तो पातकांच्या राशीच, ह्या भूमीस भार जाण. कारण काय, तर इंद्रियांनीं कुकर्म करून–वाईट कर्मानें –त्याच्या आयुष्याचा नाश झाला; इंद्रियांच्या सर्वथैव उपयोगाचा झाला. (इंद्रिय = कर्माचें साधन, ज्ञानाचें साधन. इंद्रियातन = शरीर). (१४०)

तें त्याच्या जन्माचें सकळ कर्म–हे अर्जुना, अतिशय निष्फळ असें निरर्थक, जसें का अकाळींच आलेले ढग–जे वर्षतच मुळीं नाहींत. म्हणून त्याचें येणें व्यर्थच नव्हें का? (१४१)

अथवा शेळीच्या गळयाचें स्तन जें निरर्थक, तसें त्याचें जियालेंपण जाण–समज, देख–ज्यास आपल्या धर्माचें अनुष्ठान घडेना जें का— (१४२)

करितां हे पांडवा! ऐक कीं, हा स्वधर्म कवणेंही–कोणीही नच सोडावा–सांडावा, त्यजावा, वगळावा. हाच एक कीं सर्वभाव, ते विद्वान होऊन–विद्वत्तेनें–निष्ठेनें भजावाच! (१४३)

असें पाहा कीं, शरीर जरी झालें तरी मग तेथें ओघाओघानेंच कर्तव्य आलें कीं! असें आहे तेथें, मग आपलें आपणांस योग्य असें जें–उचित तें कां बरें टाकावें–त्यजावें तें? (१४४)

.ऐक–परिस–कीं, हे सव्यसाची अर्जुना! देहाची मूर्ति प्राप्त होऊन जे कर्मासंबंधीं खंती (तिरस्कार, त्रास, तिटकारा, कंटाळा, खेद, वीट, दुःख, अस्वस्थता, अविश्वास, नास्तिकपणा, मद) करतात, ते अडाणी, गांवढळ होत. (१४५)

**यस्त्वात्मरतिरेव स्यादात्मतृप्तश्च मानवः ।**
**आत्मन्येव च संतुष्टस्तस्य कार्यं न विद्यते ॥ १७ ॥**

[आत्मतृप्ति–तृप्ति = इच्छाशांति, संतोष, तृप्त, पुरोडाश, चंद्र, समुद्र, तूप, लाकूड, दुःख. संतुष्ट = तृप्त. आत्मरति = रति = आसक्ति, छंद, प्रीति, प्रेम, विषयसुख, आनंद, सुख. कार्यं न विद्यते = त्याजला कांहीं करण्याचें उरलें नाहीं.]

**अन्वय :** तु यः मानव, आत्मरतिः एव स्यात् आत्मतृप्तः च आत्मनि एव संतुष्टः, न विद्यते तस्य कार्यम् ।

**अर्थ :** परंतु जो मनुष्य आत्मज्ञानांत रममाण असणारा–आत्मज्ञानानें तृप्त व आत्मज्ञानाविषयीं संतुष्ट असतो–त्याला स्वतःचें कार्य म्हणजे करावयाचें कांहींही नसतें (१७).

**देखें असतेनि देहधर्में । एथ तो एक न लिंपेचि कर्में ।**
**तो अखंडित रमे । आपणपें ॥ १४६ ॥**

**जैं तो आत्मबोधें पोखला । तऱ्ही कृतकार्य देखैं जाला ।**
**म्हणोनि सहजें सांडला । कर्मसंगो ॥ १४७ ॥**

लिंपेच–लिंपे = कर्माचा चिखल त्यास लागत नाहीं. तो–जो. अखंडित रमे आपणपें = स्वस्वरूपीं रमतो संतत कीं. आत्मा हा संघाताचा (संघात = समुदाय, संयोग, कफ, ऐक्य, कठीण भाग, प्रवाह) साक्षी–प्रकाशक–आहे; व म्हणून संघाताहून वेगळा आहे. असतेंनि देहधर्में = देहाचे व्यापार चालत असतांना–देहाच्या स्वाभाविक सुखदुःखादि धर्मांनें असतां (१४६). जैं–जें. पोखला–तोषला = तुष्ट झाला. तऱ्ही–तरि. देखैं–देख. जाहला–जाला. सहजें–सहज. सांडला–सांडवला = मुकला. कर्मसंगो = आसक्तिजनक विषय, विषयासक्ति, कर्म-आसक्ति, कर्मसंबंध (१४७).

हें जाण कीं, देहाच्या स्वाभाविक सुखदुःखादि धर्मांनें असतांना, येथें तोच एक कर्मांनें लिंपला जात नाहीं–जो का आत्मस्वरूपांत आपणच येत असतो–(जो अखंडित रमे आपणपें). (१४६)

जो का तो आत्मबोधानें–ब्रह्मबोधानें–तोषला, तरी कृतकार्य जाहला जाण; आणि म्हणून सहजपणेंच कीं कर्मसंगास सांडवला होय–(मुकला–पासून मुक्त झाला). (१४७)

**नैव तस्य कृतेनार्थो नाकृतेनेह कश्चन ।**
**न चास्य सर्वभूतेषु कश्चिदर्थव्यपाश्रयः ॥ १८ ॥**

[न एव तस्य कृतेन अर्थः इह = ह्या जगीं ज्ञानी जो त्याला केलेल्या कोणत्याही कर्मांनें काम असा नाहींच–नसतो. कः च न अकृतेन इह (तस्य) = कांहींही नच केलेलें तरी कोणत्याही लाभाची हानीही त्याला नसते. (अर्थ = याचना करणें, विनविणें, इच्छिणें, हेतु, इच्छा, वस्तु, पदार्थ, कारण, निमित्त. कृत–अकृत = (अकृतेन) = अर्धवट केलेलें, नैमित्तिक, कार्य, कारण, परमात्मा. कृत = कृतेन = केलेलें कर्म, कार्य-फळ, कारण, हेतु. अस्य सर्वभूतेषु न कश्चित् व्यपाश्रयः अर्थः = ज्ञानी पुरुषाचा–(चराचर भूतमात्रामध्यें) सर्वभूतेषु–सर्व भूतमात्राच्या ठायीं कोणत्याहि प्रकारचा पदार्थ का व्यक्ति नाहीं कीं ज्याच्या आश्रयावर–ज्ञानियाचा आत्मलाभ वा हानी अवलंबून आहे.]

**अन्वय :** न एव तस्य कृतेन अर्थः । न अकृतेन इह कः च न । नच अस्य सर्वभूतेषु कश्चित् अर्थ व्यपाश्रयः ।

**अर्थ :** कारण येथें, ह्या जगांत त्याला कांहीं करण्याचें किंवा न करण्याचें नाहीं; तसेंच स्वतःकरितां कांहींच मिळवावयाचें नसतें; त्याचप्रमाणें त्याचें स्वतःचें हित कोणत्याहि पदार्थावर अवलंबून नसतें.

**तृप्ति जालिया जैसीं। साधनें सरती आपैसीं।**
**देखें आत्मतुष्टि तैसीं। कर्में नाहीं ॥ १४८ ॥**
**जंववरी अर्जुना। तो बोध न भेदे मना।**
**तंवचि या साधना। भजावें लागे ॥ १४९ ॥**

आपैसीं = आपोआपच. तृप्ति = संतोष (१४८).

तृप्ति झाली म्हणजे सर्व साधनें आपोआपच कीं संपतात–सरतात, बाजूंस होतात. कर्मानें कांहीं तसली आत्मतुष्टि आत्मस्वरूपी–स्वरूपानंदामध्यें–पावणारी होत नाहीं! (त्यानें, ब्रह्मनिष्ठानें केलेल्या कर्मानें लाभ अर्थ कांहींच नसतो; तसेंच कांहींएक कर्म न केलें तरी कोणत्याहि तऱ्हेची हानीही नाहीं, आणि असा ह्या पुरूषाचा–सर्वभूतेषु–चराचर भूतमात्रामध्यें कोणत्याहि प्रकारचा अर्थ–व्यपाश्रय–पदार्थ वस्तु नाहीं कीं ज्याच्या आश्रयावर लाभ का हानी अवलंबून आहे.) (१४८)

जोंपर्यंत हे अर्जुना! तो बोध मनास सांपडत नाहीं–पोहोंचत नाहीं, भेटत नाहीं तोंपर्यंत ह्या साधनांना योजावें–भजावें, अनुसरावें–(प्रेम करणें, सेवा करणें, कृपा करणें)–(साधन = उपकरणें, उपाय, द्रव्य, हेतु, प्रमाण. साधना = संपादणें, पूजा.) (१४९)

**तस्मादसक्तः सततं कार्यं कर्म समाचर।**
**असक्तो ह्याचरन् कर्म परमाप्नोति पूरुषः ॥ १९ ॥**

[असक्तः = वासनाशून्य, कर्मफल-आशारहित पुरुष. कर्म कार्य = वर्णाश्रमविहित कर्तव्यकर्म (कार्यम्) जें. समाचर = आचरत जा. पुरुषः असक्तः कर्म आचरन् परम् आप्नोति = असक्त, निरिच्छ पुरुष निष्काम बुद्धीनें जें कर्म आचरतो त्यानें त्यास मोक्षप्राप्ति होते.]

**अन्वय :** तस्मात् सततं असक्तः कर्म कार्यं समाचर। असक्तः हि आचरन् कर्म परम पूरुषः आप्नोति।

**अर्थ :** ज्या अर्थी अनासक्त पुरुष निष्काम बुद्धीनें कर्म करून अमृतत्व मिळवितो, त्या अर्थी तूं निष्काम बुद्धीनं कर्तव्य कर्म कर–कर्मयोग आचर. [ईश्वरार्पण बुद्धीनें कर्म करीत असतां–पापक्षयानं व चित्त-शुद्धीच्या साहाय्यानं शेवटीं मोक्षाला प्राप्त होतो. येथें महत्त्व सर्व तें निष्काम कर्मानेंच कीं–ती ज्ञानप्राप्ती होणारी ना!] (१९).

**म्हणोनि तूं नियंतु। सकळकामनारहितु।**
**होउनियां उचितु। धर्में राहाटें ॥ १५० ॥**
**जे स्वधर्में निःकामता। अनुसरले गा पार्था।**
**ते कैवल्यपर तत्त्वतां। पावले जगीं ॥ १५१ ॥**

म्हणोनि–म्हणउनि. नियंतु–नियत = नियमानें, सदोदित. रहितु–रहित. उचितु–उचित, वर्णाश्रम-धर्मास उचित अशा. धर्में राहाटें–स्वधर्में राहाटें = नित्ययज्ञामध्यें. नियत = बांधलेला, ताब्यांत ठेवलेला, पाळलेला, जितेंद्रिय, स्थिर, निश्चित, ठराविक, एकाग्र, नेहमीं, अनिवार्य (१५०). निःकामता–निष्कामता = निकामम् = कामम्, प्रकामम्, पर्याप्त, निकामम्, इष्टुं यथोप्सितम् इति ६ यथोप्सितस्य। गा पार्था–पार्था. कैवल्यपर–कैवल्यपद = मोक्षपद, स्वरूप, प्रतिष्ठा, ब्रह्मभाव, अद्वितीय. कैवल्य = निःसंगपणा, अद्वितीयत्व, मोक्ष. पर = उच्च ध्येय, परमात्मा, मोक्ष, ईश्वर, विष्णु, ब्रह्म केवळ (१५१).

याकरितां आणि म्हणून तूं नियत, नित्य, सदोदित, कामना–इच्छारहित असा योग्य–उचित होऊन स्वधर्में राहाट–स्वधर्मास आचर, स्वधर्मांत वावर. (१५०)

स्वधर्मात वावरण्यानें–स्वधर्म आचरण्यानें जे निष्कामतेस अनुसरले–हे पार्था! तत्त्वतः ते–सत्य, वास्तविक स्वरूपानें, खरेपणानें–मोक्षपद, कैवल्यपद स्वरूप, प्रतिष्ठा, अद्वितीय, ब्रह्मभाव–ह्या जगीं पावलें (१५१).

**कर्मणैव हि संसिद्धिमास्थिता जनकादयः ।**
**लोकसंग्रहमेवापि संपश्यन्कर्तुमर्हसि ॥ २० ॥**

[जनकादि आदयः = जनकप्रभृति. कर्मणा एव = कर्मानुष्ठानानेंच. हि = कारण. संसिद्धिम् = मोक्ष-रूप, पुरुषार्थरूप. आस्थिता = मिळविण्याचा प्रयत्न केलेला. लोकसंग्रहम् एव = लोकांची कर्तव्यकर्माकडेच प्रवृत्ति व्हावी हें कारण (संपश्य) लक्षांत ठेवून, (कर्तुं अर्हसि) आपलें कर्तव्यकर्म करणें तुला उचित आहे. स्था + आ = वर बसणें, धारण करणें, आश्रयणें, पाळणें, अनुसरणें, सज्ज होणें, प्रतिज्ञा करणें. सिद्ध सम् = पूर्णत्वास जाणें, सिद्धि, मोक्ष, इत्यादि पावणें. संपश्यन् = हें कारण लक्षांत ठेवून.]

**अन्वय :** जनकादयः कर्मणा एव हि संसिद्धिम् आस्थिताः लोकसंग्रहम् एव अपि संपश्यन् कर्तुम् अर्हसि ।

**अर्थ :** कारण कर्मयोगानेंच जनकादि महात्मे अमृतत्त्वाला प्राप्त झाले आहेत. लोककल्याणाकडे लक्ष देऊन तुला कर्मयोगच आचरला पाहिजे–(जनकादि सार्वभौम अशेष कर्मजात न सांडतांहि मोक्षसुखाप्रत पावले (२०).

**देख पां जनकादिक । कर्मजात अशेष ।**
**न संडितां मोक्षसुख । पावते जाले ॥ १५२ ॥**

**याकारणें पार्था । होआवी कर्मीं (आस्छा) आस्था ।**
**हे आणिकही (येक) एक अर्था । उपकारेल ॥ १५३ ॥**

**जे आचरतां आपणपेया । देखी लागेल लोका यया ।**
**तरि चुकेल हा अपाया । प्रसंगेंची ॥ १५४ ॥**

**देखें अनार्त जालें । जे निष्कामता पावले ।**
**तयांही कर्तव्य असे उरलें । लोकांलागीं ॥ १५५ ॥**

**मार्गीं अंधासरिसा । पुढा देखणाहि चाले जैसा ।**
**अज्ञाना प्रकटावा धर्म तैसा । आचरोनी ॥ १५६ ॥**

**हां गा ऐसे जऱ्ही न कीजे । तरी अज्ञाना काय उमजे ।**
**तिहीं कोणेपरी जाणिजे । मागती ॥ १५७ ॥**

अशेष–अशेख. न संडितां–न सांडितां–सांडितांचि. पावते जाले–पावत जाहले = मज मिळाले (१५२). एक अर्था–एका अर्था–(अर्थ = हेतु, इच्छा, वस्तु, पदार्थ, पुरुषार्थापैकीं एक, विनंति, मानणें, वस्तुस्थिति). कर्मीं आस्था = आदर, संमति, काळजी. आस्छा–आस्था. एक अर्था उपकारेल = भूषवील, उपयोगी पडेल–धर्म, अर्थ, काम, मोक्ष–एक (१५३). आपणपेया–आपणया. देखी = मार्ग, वळण (१५४). अनार्त–प्राप्तार्थ = कृतकृत्य, योग्य अर्थ, पुरुषार्थ एक (१५५). पुढा–पुढें. देखणाहि–देखणाही = डोळसमुद्धां (१५६). जऱ्ही–जरी. तरी–तरि. तिहीं–तिहिं. कोणेपरी–कवणेपरी. मागती–मार्गाते या (१५७).

जनक आदिकरून सार्वभौमत्व (पावलेलेसुद्धां) अशेख कर्मजात न सांडतां, न सोडतांही मोक्षसुख पावते झाले (१५२).

स्वतःसच आचरण्याचें केल्यानें–जें आपण स्वतः आचरल्यानें–लोकांस आपलें कर्माचरण पाहण्यास, शिकण्यास मिळेल. (१५३).

देखी लागेल लोका यया, प्रसंगानेंच कीं, मग अपाय तो टळेल कीं- (१५४)

देखे पाहा कीं, जे कृतकृत्य झाले-प्राप्तअर्थ झाले जे का-निरिच्छता, निष्कामता पावले, त्यांना लोकांसाठीं कर्तव्य तें उरलें आहेच कीं- (१५५)

मार्गानें-मार्गामध्यें आंधळ्याप्रमाणें पुढें देखणा, डोळसमुद्धां चालत आहे जसा का-तसा अज्ञानांस धर्म आचरून प्रकटांना उघड-स्पष्ट करावा, दाखवावा, प्रकाशवावा. (१५६)

अहो, असें जर नच करावें तर मग अज्ञानांस काय तें उमजणारें-उमगणारें-होईल. त्यांनीं ह्या मार्गास कोणत्या बरें प्रकारें जाणावें तें? (१५७)

**यद्यदाचरति श्रेष्ठस्तत्तदेवेतरो जनः ।**
**स यत्प्रमाणं कुरुते लोकस्तदनुवर्तते ॥ २१ ॥**

[यत् यत् आचरति = जें जें कांहीं करतो. श्रेष्ठ = विद्वान पुरुष. तत् तत् एव इतरे जनाः = तेंच तेंच इतर जन (लोक) आचरतात. सः श्रेष्ठः यत् प्रमाणं कुरुते = तो श्रेष्ठ पुरुष जें कांहीं प्रमाण करून ठेवतो. लोकः तत् अनुवर्तते = लोक त्याचेंच अनुकरण करतात.]

**अन्वय:** श्रेष्ठ यत यत् आचरति तत् तत् एव इतरः जनः (आचरति)। सः (श्रेष्ठः) यत् प्रमाणं कुरुते तत् लोकः अनुवर्तते ।

**अर्थ:** श्रेष्ठ पुरुष जें जें कांहीं करतो तेंच इतर सामान्य जन करीत असतात. तो श्रेष्ठ पुरुष जें कर्म करतो, त्यालाच प्रमाण समजून लोक अनुसरतात (२१).

**जेथें वडील जें जें करिती । तया नाम धर्म ठेविती ।**
**तोचि येर अनुष्ठिती । सामान्य सकळ ॥ १५८ ॥**
**हें ऐसें असे स्वभावें । म्हणोनि कर्म न सांडावें ।**
**विशेषें आचरावें । लागेल संतीं ॥ १५९ ॥**

जेथें-एथ. वडील = श्रेष्ठ पुरुष. तोचि-तेचि. सामान्य = सर्वसाधारण, मध्यम, सार्वत्रिक नियम (१५८). न सांडावें-न संडावें-लागेल-लागे (कष्ट करणें, आवश्यक होणें, स्पर्श करणें, आरंभ करणें, परिणाम होणें, चिकटून राहणें). विशेषें = विशेषतः. संतीं = संतांनीं-स्वतः कृतार्थ होऊन दुसऱ्यास मार्ग दाखविण्यास तयार झालेले संत-पुरुष-त्यांनीं तर स्वधर्माचरण केलेंच पाहिजे असें आहे (१५९).

एथ वडील-ज्ञानानें, अनुभवानें मोठे-जें जें करिती त्यांच्या वागणुकीसच 'धर्म' म्हणतात; व तोच धर्म इतर दुसरे सर्वसाधारण सकळ लोक आचरतात (१५८).

असें हें सहजस्वभावेंकरूनच कीं होत असतें, म्हणून कर्म सांडूं नये. संतांनीं तर विशेषेंकरून-स्वतः कृतार्थ होऊन दुसऱ्यास मार्ग दाखविण्यास तयार झालेले पुरुष ज्यांना संत म्हणतात-त्यांनीं तर स्वधर्माचरण केलेंच पाहिजे; स्वधर्मच वागविला पाहिजे. स्वधर्माचरण-संबंधाचें-संपर्काचें, आसक्तीचें, मैथुन, स्पर्शाचें केलेंच पाहिजे (१५९).

**न मे पार्थास्ति कर्तव्यं त्रिषु लोकेषु किंचन ।**
**नानवाप्तमवाप्तव्यं वर्त एव च कर्मणि ॥ २२ ॥**

[न किंचन = कोणतेंही कर्तव्य. मे = मला. लोकेषु = तिन्ही लोकीं. अवाप्तव्यम् = मिळवावयाचें आहे असें. अनवाप्तम् = मला न मिळालेलें. कर्मणि एव वर्ते = मी एखाद्या संसारिकाप्रमाणेंच वागतों व वर्तत आहें.]

**अन्वय :** न किंचन हे पार्थ मे कर्तव्यं त्रिषु लोकेषु, न अस्ति अनवाप्तम् अवाप्तव्यम् च कर्मणि एव वर्ते।

**अर्थ :** अर्जुना! ह्या तिन्हीं लोकांत मला स्वतःकरितां कांहींच कर्तव्य करावयाचें उरलेलें नाहीं. कारण मला अप्राप्त किंवा प्राप्तव्य असें कांहींच नाहीं. तथापि मी कर्मामध्यें वर्तत आहें, म्हणजेच कर्मयोगाच्या आचरणानें आहे (२२).

**आतां आणिकांचिया गोष्टी। कायसी तुज सांगों किरीटी।**
**देखें मीचि (यिया) इया राहाटीं। वर्ततसें॥ १६०॥**

**काय सांकडें कांहीं मातें। कीं कवणें (येक) एकें आर्तें।**
**आचरें मी धर्मातें। म्हणसी जऱ्ही॥ १६१॥**

**तरी पुरतेपणालागीं। आणिक दुसरा नाहीं जगीं।**
**ऐसी सामग्री (माझा) माझ्या आंगीं। जाणसी तूं॥ १६२॥**

**मृत गुरुपुत्र आणिला। तो तुवां पवाडू देखिला।**
**तोहि मी उगला। कर्मीं वर्तें॥ १६३॥**

**परी स्वधर्मीं वर्तें कैसा। साकांक्ष होय जैसा।**
**तयाचि एका उद्देशा। लागोनियां॥ १६४॥**

कायसी तुज सांगो– कायशा सांगो. इया (यिया)–इये. वर्ततसें–वर्तत असें. गोष्टी = उदाहरणें, प्रमाणें, दाखले. आणिकांचिया = दुसऱ्यांच्या (१६०). जऱ्ही–जरी. सांकडें = संकट. आर्तें = इच्छेनें, कामनेनें. धर्मातें = उचित वर्णाश्रम धर्मास योग्य जें कर्म (१६१). पुरतेपणालागीं = पूर्णतेस. नाहीं–नाहिं. सामग्री = साहित्य, (सर्व विद्या, ब्रह्मविद्या), सामुग्री, सामर्थ्य. (सारस्वत = अलंकार वाङ्मय) (१६२). मृत गुरुपुत्र = सांदीपनी गुरूचा पुत्र. पवाडू–पवाडा = पराक्रम; औदार्याचीं, शौर्याचीं, लोकोत्तर बुद्धिमत्तेचीं कृत्यें-तीं गाइलीं जाणारीं कवनें; पोवाडे; शूर पुरूषांवर केलेलीं काव्यें. [उदा० सिंहगडचा पोवाडा, 'शूर मर्दाचा पोवाडा शूर मर्दानें ऐकावा।'] उगला कर्मी वर्ते = उगले = उगाच निरिच्छपणानें कर्मांत वर्तत–वागत आहे (१६३). साकांक्ष होन–साकांक्ष (सकाम) का होय. कांक्षा = स्पृहा, इच्छा, काङ्क्षा, ईहा, तृड्, वाञ्छा, लिप्सा, मनोरथ, काम, अभिलाषा, तर्ष, लालसा इति १२ स्पृहा। उद्देशा = हेतु, बोलणें, पूर्ण, दृष्टान्त, शोध. तयाचि एका उद्देशा। लागोनियां = एका लोककल्याणाच्या हेतूनेंच कीं वागणारा (१६४).

आणिकांच्या गोष्टी–दुसऱ्यांचीं उदाहरणें–आतां हे किरीटी कशास?–त्या सांगण्याच्या व्हाव्यात बरें! देख मीच कीं, इयें राहाटीं वर्तत आहें. (१६०)

काय संकट मला, जें का मी कोणत्या एखाद्या इच्छेनें, आर्ततेनें धर्मास आचरत आहे, असें जरी का म्हणणें केलेंस– (१६१)

तरी पुरतेपणास–पूर्णतेस–दुसरा आणीक ह्या जगीं नाहीं. अशी सामग्री, साहित्य, साधनें, विपुलता, उपकरणें माझ्या अंगीं आहेत हें तूं जाणतोच आहेस (१६२).

गुरु सांदीपनीचा मृत पुत्र आणिला, तो थोरपणाचा, महत्त्वाचा पराक्रम तूं पाहिला आहेसच-असा तोहिपण मी निरिच्छपणानें कर्मामध्यें वर्तत आहें,-कर्म कर्तव्यांत वागतों आहें ना!— (१६३)

कसा तो पण स्वधर्मामध्यें वर्तत, वागत आहें कीं, जसा का सकामच एक होऊन असेल जो–तो जसा का वागेल तसाच कीं मी वागत आहें. त्याच एका हेतूसाठीं–उद्देशासाठीं–जें का लोककल्याण साधावेंच सर्वथैव! (१६४)

**यदि ह्यहं न वर्तेयं जातु कर्मण्यतन्द्रितः ।**
**मम वर्त्मानुवर्तन्ते मनुष्याः पार्थ सर्वशः ॥ २३ ॥**

[यदि = जर. वर्तेयं = न वागलों, कांहींच केलें नाहीं. अतन्द्रितः = निरलस होऊन. जातु = कदाचित्. मम वर्त्म = माझ्याच मार्गाला. अनुवर्तन्ते = अनुसरतील, (सेवा करणें, वळणावर जाणें, अनुसरणें). सर्वशः = सर्वप्रकारें. मनुष्याः = सामान्य जन. अयं जातु = कदाचित्, एखादे वेळीं–कदाचित् जातु इति २ कस्मिंश्चित् काले । ]

**अन्वय :** अहं यदि हि न वर्तेयं कर्मणि अतन्द्रितः जातु, मम वर्त्म अनुवर्तन्ते सर्वशः मनुष्याः-सर्वशः अनुवर्तन्ते अयं जातु ।

**अर्थ :** कारण अर्जुना! जर कदाचित् प्रसंगीं मी कर्मात दक्षपणें–दाक्षिण्यानें–वागणार नाहीं, तर लोक माझ्याच मार्गाला म्हणजे दुर्लक्षाला–अनावस्थेलाच–पूर्णपणें अनुसरतील (२३).

**जें भूतजात सकळ । असे आम्हां आधीनचि केवळ ।**
**तऱ्ही न (ऱ्हात्रें) रहात्रें वरळ । म्हणोनियां ॥ १६५ ॥**
**आम्ही पूर्णकाम होउनी । जरी (आत्मस्छिती) आत्मस्थिती राहुनी ।**
**तरी प्रजा हे कैसेनी । निस्तरेल ॥ १६६ ॥**

न (ऱ्हावें) रहावें–न व्हावें = बरळणारें असें अपभ्रष्ट होऊन असूं नये (१६५). पूर्णकाम = षड्गुणैश्वर्य. आत्मस्थिती = चिदात्मस्थितीनें. प्रजा = वंशज, जन्मसंतति, अपत्य, जन. निस्तरेल = पार पडेल (१६६).

कारण काय, तर जे कांहीं हे सर्व भूतजात–भूतमात्र–ते केवळ आमच्याच आधीनपणावर स्वस्थ असलेले, आणि म्हणून आम्हीं बरळ, भ्रष्ट, नच व्हावें कीं— (१६५)

आम्हीं पूर्णकाम होऊन आनंदांत राहिलों व स्वधर्माचरणास सोडून दिलें तर ह्या प्रजांना–ह्या लोकांना–तरणोपाय कसा पोहोंचेल–सांपडे तो ?–भवसागरांतून पार पडेल, तरेल, वर्तेल, फेडीचें होणें, मोक्षाचें होणें तें तेथें आपलेसें होईल? (१६६)

**उत्सीदेयुरिमे लोका न कुर्यां कर्म चेदहम् ।**
**संकरस्य च कर्ता स्यामुपहन्यामिमाः प्रजाः ॥ २४ ॥**

[चेत् = जर. कर्म न कुर्या = सदाचरणानें वागणार नाहीं–सदाचरणाचें वर्तन करणार नाहीं. इमे लोका = हे ज्ञानशून्य सर्व लोक. उत्सीदेयुः = नाश पावतील. संकरस्य च = वर्णसंकराचा मी कर्ता झालों असें होईल. इमाः प्रजाः उपहन्याम् = ही सर्व प्रजा नाश पावेल–निंदित होईल (व मीच जणूं त्यांचा घात केला असें होईल). (कर्मकरः = वेतनोपजीविनः, भृतकः, भृतिभुक्, कर्मकरः, वैतनिकः । कर्म = सदाचरण.)]

**अन्वय :** चेत् अहं कर्म न कुर्याम् इमे लोकाः उत्सीदेयुः कर्ता संकरस्यच इमाः प्रजाः उपहन्याम् स्याम् ।

**अर्थ :** जर मीं कर्तव्य केलें नाहीं तर हे सर्व लोक उत्सन्न (समाज-अवस्थेस उच्छेदाचे करणारे) होतील व तेणेंकरून उपहन्य असें जें मनुष्यपण, तेथील अक्षरांस विकाराचा किंवा मायेचा गुण लागल्यामुळें, तेथील वर्णाक्षर संकळलेले असें होऊन, अन्न तेथील आपलें विश्वप्रजनन सामर्थ्यच मुळीं हरवलें असें होऊन संकलिन असें होईल (२४).

**ईहीं आमची वास पाहावी । मग वर्ततीपरी जाणावी ।**
**तैं लौकीक (स्छिती) स्थिती अघवी । नाशिली होईल ॥ १६७ ॥**

**म्हणौनि समर्थ जो येथें । आथिला जो सर्वज्ञते ।**
**तेणें विशेष कर्मातें । त्यजावें ना ॥ १६८ ॥**

तैं लौकीक स्थिती– ते लोकस्थिति = समाजस्थैर्य, लोकाचार. वर्ततीपरी = वर्तनक्रम. वास = वाट, मार्ग (वासः = कुटीशाला सभा इति ४ सभागृहस्य।), वासु = आत्मा, परमात्मा, राहणें, गृह, स्थान (१६७). आथिला जो सर्वज्ञते–आथिला सर्वज्ञते. विशेष-विशेषें (१६८).

ह्या लोकांनीं, प्रजांनीं, आमची वाट (वास-वाट, मार्ग, वर्तन, माजघर. वासयोगः = बुक्का) पाहावी; मार्गप्रतिक्षा करावी; (वाट, नजर-तेव्हेळि जयाकडे वास पाहे। तेउता मीचि येकु तया आहे ······ ॥ १३२–७ ॥ ···मग देहाची वास न पाहे। आंगचि सुख होऊनि जाये······ ॥ २७१–६ ॥ [वास= सुगंध, वासाचें पुट, वस्ती, राहणें, रहिवास, बाजू, रीती, क्रम] व मग वर्तनक्रम पाहावा–वर्तनावर जाणावी. तेथें समाजस्थैर्य, लोकाचार आधीं सर्व नाशिलें होईल ना!

म्हणून येथें जो समर्थ–सर्वज्ञतेनें योग्य (आथिला आहे)–त्यानें विशेषेंकरून कर्मास पाठ दाखवूं नये –सोडूं नये. (१६८)

**सक्ताः कर्मण्यविद्वांसो यथा कुर्वन्ति भारत।**
**कुर्याद्विद्वांस्तथासक्तश्चिकीर्षुर्लोकसंग्रहम् ॥ २५ ॥**

[कर्मणि = कर्तृत्वाभिमानानें व फलाशेनें. अविद्वांस् = ज्ञानशून्य लोक. सक्ताः = आसक्त झालेले. कुर्वन्ति = ज्याप्रमाणें काम्य कर्में करतात. कुर्यात् = निरपेक्ष बुद्धीनें कर्म करावें. असक्तः = फलाची आकांक्षा व अभिमान न ठेवतां. लोकसंग्रहम् = लोकांवर अनुग्रह करण्याची; कर्तव्यकर्माकडे लोकांची प्रवृत्ति वृद्धिंगत व्हावी हें कारण लक्षांत ठेवून. चिकीर्षुः = इच्छा करणाऱ्यांनीं, आत्मज्ञानी मनुष्यांनीं.]

**अन्वय :** भारत, कर्मणि अविद्वांसः सक्ताः यथा कुर्वन्ति तथा कुर्यात् असक्तः लोकसंग्रहम् चिकीर्षुः विद्वान्।

**अर्थ :** अर्जुना! अविद्वांस्, सामान्य लोक फळाच्या इच्छेनें आस्थापूर्वक कर्म करीत असतात, त्याप्रमाणेंच विद्वान् मनुष्यानेंही अनासक्त राहून लोकसंग्रहासाठीं कर्तव्यकर्म केलें पाहिजे (२५).

**देखें फळाचिया आशा। आचरे कां कामीक जैसा।**
**कर्मीं भर व्हावा तैसा। नैराश्यासी ॥ १६९ ॥**

**जें पुढती पार्था। हे सकळ लोक (संस्छा) संस्था।**
**रक्षणीय सर्वथा। म्हणोनियां ॥ १७० ॥**

**मार्गाधारें वर्तावें। विश्व मोहरे लावावें।**
**अलौकिका नोहावें। लोकांप्रती ॥ १७१ ॥**

आचरे कां कामीक–आचरे कामुक (कामि = विलासी पुरुष. कामुक = लोभी, विषयासक्त). व्हावा– होआवा. नैराश्यासी–निराशाही (निरिच्छपणा) (१६९). पुढती–पुढत पुढती = वारंवार. लोकसंस्छा– लोकसंस्था = लोकसमाज. म्हणोनियां–म्हणउनियां (१७०). विश्व–विश्व हें. नोहावें–न व्हावें. मोहरे = सामोरे, पुढें. अलौकिका–अलौकिक = विलक्षण, असामान्य. लोकांप्रती = विश्व, लोक, प्रजा, समुदाय संबंधाचें (१७१).

देख कीं–फळाच्या इच्छेनें कामुक, विषयासक्त, कामातुर, स्त्रीलोभी जसा आचरतो, तसा निराशादि कर्मीं भर व्हावाच कीं— (१६९)

कारण काय, तर हे पार्था! वारंवार हा लोकसमाज सर्वथा रक्षणीय, सांभाळण्यालायक–राखणें, जपणें, सांभाळ करणें, रक्षणें म्हणून— (१७०)

मार्गाधारें वर्तावें–सूज्ञ वाडवडिलांनीं घालून दिलेल्या पद्धतीनें, मार्गानें, मार्गाच्या धोरणांनीं चालावें–विश्व हें मोहरे लावावें. मानवसमाज कर्मप्रवृत्त असें पुढाईत करावें (लोकांप्रति, लोकांस, लोकविरुद्ध नोहावें–न व्हावें). लोकांनीं, लोकांप्रती, लौकिकाचें व्हावें–अलौकिक नच व्हावें! (१७१)

**न बुद्धिभेदं जनयेदज्ञानां कर्मसंगिनाम् ।**
**जोषयेत्सर्वकर्माणि विद्वान्युक्तः समाचरन् ॥ २६ ॥**

[कर्मसंगिनाम् अज्ञानां = फलाशेनें कर्मांमध्यें गढलेल्या, रमलेल्या ज्ञानशून्य लोकांचा. बुद्धिभेदं = (कर्मासंबंधीं) गैरसमज. न जनयेत् = विद्वानानें उत्पन्न करूं नये. विद्वान् = ज्ञानसंपन्न पुरुषानें. युक्तः = योगयुक्त, समत्वबुद्धीनें युक्त होऊन. समाचरन्=स्वतः सर्व कर्में निरनिराळ्या बुद्धीनें आचरण करून.]

**अन्वय :** कर्मसंगिनाम् अज्ञानां बुद्धिभेदं न जनयेत् । विद्वान् युक्तः सर्वकर्माणि जोषयेत् समाचरन् ।

**अर्थ :** मार्गाधारें चालावें; विश्व हें आपली उन्नति पाहील असेंच काम करावें. लोकांना केव्हांहि त्यांच्या लौकिकाच्या वाढीचें असेंच महत्त्व सांगावें. कर्मसंगी जे आहेत त्यांच्या अज्ञानाबाबत केव्हांही उच्चार करूं नये; विद्वानानें युक्त होऊन सर्व कर्में हीं तेथें भर देऊन करीत असावें (२६).

**जें सायासें स्तन सेवी । तें पक्वान्नें केविं जेवी ।**
**म्हणोनि बाळका जैसीं नेदावीं । धनुर्धरा ॥ १७२ ॥**

**तैसी कर्मीं जया अयोग्यता । तयाप्रती नैष्कर्म्यता ।**
**न प्रकटावी खेळतां । आदिकरुनी ॥ १७३ ॥**

**तेथें सत्क्रियाचि लावावी । तेचि (येक) एक प्रशंसावी ।**
**नैष्कर्म्यही दावावी । आचरोनी ॥ १७४ ॥**

**तया लोकसंग्रहालागीं । वर्ततां कर्मप्रसंगीं ।**
**तो कर्मबंध आंगीं । वाजैलना ॥ १७५ ॥**

**जैसी बहुरूपींची रावो राणी । स्त्रीपुरुष-भाव नाहीं मनीं ।**
**परी लोकसंपादणी । तैसीचि करिती ॥ १७६ ॥**

**देखें पुढिलांचें वोझें । जरी आपला माथां घेईजे ।**
**तरी सांगें कां न टाकिजे । धनुर्धरा ॥ १७७ ॥**

स्तन–स्तन्य. नेदावीं = देऊं नयेत. सायास = श्रम, कष्ट. सायासें पुण्य अर्जिजे। मग संसार कां अपेक्षिजे। .... ओ. २१३ अ. २ ॥ (१७२). कर्मीं अयोग्यता=लायकी नाहीं, साधन क्रियाकर्मासंबंधीं कर्मनिष्ठतेचें आचरण. खेळतां = विनोदानें (१७३). नैष्कर्म्यहि–निष्कर्मींहि = आत्मज्ञान कर्ममुक्तता. सत्क्रिया = सदाचरण, स्वधर्माचरण, सदाचार, शिष्टाचार (१७४). कर्मप्रसंगीं–कर्मसंगीं. लोकसंग्रहालागीं वर्ततां = वागणें, वर्तनकर्मीं वागतां. कर्मबंध आंगीं वाजैलना = शरीरीं आदळेल, अंगावर येईल, आदळणार

नाहीं काय? (१७५). बहुरूपींची–बहुरूपियाचि. स्त्रीपुरुषभाव-स्त्रीपुरुषभावो. तैसीचि-तैसीच (१७६). पुढिलांचें = दुसऱ्याचें. टाकिजे–दाटिजे (टाकिजे = ठकिजे–ठकविले जाणारें होईल की नाहीं. दाटिजे = मान अवघडणें, वांकणें) (१७७).

हे धनुर्धरा ! जें (बालक) मोठ्याच मोठ्या सायासानें, कष्टानें, श्रमानें स्तन्य म्हणजे दूध पिणारें, तें पाक म्हणजे पक्वान्न कसें बरें जेवील? आणि म्हणून पक्वान्नें तीं बालकास सहज विनोदानेंसुद्धां देऊं नयेत–न द्यावीं (१७२).

त्याप्रमाणें उपास कर्मी–कर्म करण्यांत अयोग्यता त्याजप्रत, विनोदानेंसुद्धां, खेळतां खेळतां नैष्कर्म्यता–कर्मापासून अलिप्तता–आदिकरूनि न प्रगटावी ! (१७३)

तेथें सदाचरण, स्वधर्माचरण, सत्क्रियाचि लावावी. तेचि (येक) एक प्रशंसावी–नैष्कर्मी–नैष्कर्म्य स्थितींतील जनांनींसुद्धां आचरावी, सेवावी. त्याच्या कल्याणाचें कर्म आचरण्याविषयीं–आचरण्यासाठीं त्याचा गौरव करावा, तेथीलचें महत्त्व सांगावें–आणि प्रत्यक्ष आचरणांत कर्म करूनही फलाशा सोडावी. (तेथें एक स्वधर्माचरण–सदाचरण एक लावावें–त्यांस सदाचारासच लावावें–सत्क्रियाच एक प्रशंसावी–वाखाणावी. नैष्कर्मी ही–नैष्कर्म्य स्थितींतील लोकांनीं–जनांनींसुद्धां–आचरून दाखवावी. (१७४)

मग तेथें वर्णाश्रमधर्माच्या संरक्षणासाठीं–वर्णाश्रमधर्माच्या रक्षणासाठीं–कर्मसंगामध्यें वर्तता तो कर्मबंध अंगीं वाजेल–अंगीं आदळणार नाहीं ! (१७५)

बहुरूपी–सोंग घेणारे–तेथें राव अथवा राणी असा स्त्रीपुरुषभाव मनीं नाहीं; पण लोकांच्या समजुतीसाठीं, लोकाचाराच्या–लोकांशीं व्यवहार वागणुकीसाठीं, तशीच संपादणी–समजुतीची करतात. (१७६)

दुसऱ्याचें ओझें जरी का आपल्या डोक्यावर घेणें आहे, तरी मग कां बरें तें जड वाटणार नाहीं? तेथें मान अवघडणें होतें–वांकणेंच होतें ! (१७७)

**प्रकृतेः क्रियमाणानि गुणैः कर्माणि सर्वशः ।**
**अहंकारविमूढात्मा कर्ताहमिति मन्यते ॥ २७ ॥**

[प्रकृतेः गुणैः = प्रकृतीच्या अंगभूत असलेल्या गुणांनीं–सत्त्वरजतमादि गुणांकडून. क्रियमाणानि = रोजचीं होणारीं, रोज केलीं जाणारीं.]

**अन्वय :** प्रकृतेः गुणैः कर्माणि सर्वशः क्रियमाणानि अहंकार विमूढ अनात्मा अहम् कर्ता इति मन्यते ।

**अर्थ :** सर्व कर्में प्रकृतीच्या सत्त्व-रज-तम गुणांकडून केलीं जातात; असें असतां मीपणानें ज्याचें अंतःकरण विचारहीन किंवा मूढ झालेलें असतें तो त्या कर्माचा मीच कर्ता आहे, असें मानतो (२७).

**तैसीं शुभाशुभ कर्में । जे निपजती प्रकृतिधर्में ।**
**ते मूर्ख मतिभ्रमें । मी कर्ता म्हणे ॥ १७८ ॥**

**ऐसा अहंकारारूढ । एकदेशी मूढ ।**
**तया हा परमार्थ गूढ । प्रकटावा ना ॥ १७९ ॥**

**हें असो प्रस्तुत । सांगिजेल तुज हित ।**
**तें अर्जुना देउनि चित्त । अवधारीं पां ॥ १८० ॥**

शुभाशुभ-शुभाशुभें. ते–तिये. निपजती प्रकृतिधर्में (= कायदा, स्वभाव, चाल, सादृश्य) (१७८). प्रकटावा ना–प्रगटावा ना = उघड, स्पष्ट करूं नये. एकदेशी = देहाला मी म्हणणारा, त्यास हा गूढ परमार्थ –गूढ म्हणजे समजण्यास, आचरण्यास कठीण (१७९). देउनि–देऊनि (१८०).

त्याप्रमाणें प्रकृतिधर्मानें जीं शुभाशुभ कर्में निपजतात तीं तेथें मतिभ्रमामुळें मूर्ख तो, 'मी कर्माचा आहें' असें म्हणतो. (१७८)

असा देहात्मबुद्धि असलेला, अहंकारारूढ देहालाच मी म्हणणारा–एकदेशी–एका देहापुरतीच आत्म-व्याप्ति मानणारा, असा मूढ फसलेला, मूर्ख बनलेला (अज्ञ, मूढ, यथाजात मूर्ख, वैधेय, बालिश)–त्यास हा समजण्यास, आचरण्यास गूढ परमार्थ प्रकटावा नच! (१७९)

प्रस्तुत हें असें असो; आतां तुजला हित सांगावें असें आहे तें चित्त देऊन हे अर्जुना, अवधारण्याचें–ऐकण्याचें करावेंम! (१८०)

**तत्त्ववित्तु महाबाहो गुणकर्मविभागयोः ।**
**गुणा गुणेषु वर्तन्त इति मत्वा न सज्जते ॥ २८ ॥**

[गुणविभाग = गुणापासून आत्मा निराळा आहे. कर्मविभाग = कर्मापासून आत्मा निराळा आहे. (तत्त्वज्ञान = ब्रह्मज्ञान, यथार्थज्ञान). तत्त्वविद् = वेदान्ती, तत्त्वज्ञानी. महाबाहो = अर्जुना. गुणा गुणेषु वर्तन्ते = गुणच गुणांमध्यें वागत–वर्तत आहेत. इति मत्वा न सज्जते = असें समजून कर्मामध्यें आसक्त होणें करीत नाहीं; कर्म करण्यास तयार होत नाहीं.]

**अन्वयः** महाबाहो, तत्त्वविद् तु गुणविभागयोः गुणाः गुणेषु वर्तन्ते इति मत्वा न सज्जते ।

**अर्थः** हे महाबाहो अर्जुना! गुण म्हणजे इंद्रिय, विषय, इत्यादि पदार्थ व कर्म म्हणजे संयोग वियोगादि व्यापार. त्या गुण व कर्म यांच्या विभागाचें–वर्गाचें तत्त्व जाणणारा (तत्त्ववेत्ता) हा सत्त्वरजतमात्मक गुणवृत्तीच गुणधर्मरूपानें परिणत होतात, गुण गुणाचे ठिकाणीं असतात असें ओळखून, कर्माचे ठिकाणीं आसक्त होत नाहीं (२८).

**जें तत्त्वज्ञानियांच्या ठायीं । तो प्रकृतिभाव नाहीं ।**
**जेथ कर्मजात पाहीं । निपजत असे ॥ १८१ ॥**

**ते देहाभिमान सांडुनी । गुणकर्मं वोलांडुनी ।**
**साक्षीभूत होउनी । वर्तती देहीं ॥ १८२ ॥**

**म्हणोनि शरीरीं जरी होती । तऱ्ही कर्मबंधा नातळति ।**
**जैसा कीं भूतचेष्टा गभस्ती । घेपवेना ॥ १८३ ॥**

तत्त्वज्ञानियांच्या–तत्त्वज्ञानाचिया = ब्रह्मज्ञान. यथार्थज्ञान. प्रकृतिभाव = शब्दाचें मूळरूप, माया, अविद्या, त्रिगुणांची साम्यावस्था. जेथ कर्मजात निपजत असे = ज्या प्रकृतीच्या पोटीं सर्व कर्म उत्पन्न होतें त्या प्रकृतीचा भाव–देहभाव–ज्ञात्याच्या ठिकाणीं नसतो (१८१). देहाभिमान सांडुनी = देहाचा मीपणा, देहममता, देहप्रेम, देहगर्व सोडून. गुणकर्मं वोलांडुनी = मूळधर्म कर्में, देहबुद्धि कर्में, रूपादि विषय, अकारादि वर्ण कर्में ओलांडून. होउनी–होऊनि. साक्षीभूत = गुणकर्माचा द्रष्टा होऊन; केवळ प्रकृतीचा द्रष्टा ही स्थिति पावून; चित्तवृत्तिनिरोध होऊन (१८२). शरीर = मूर्तिमंत वस्तु, प्राणी, जीवात्मा, जीवंत. नातळति–नाकळती = (आकलन = धरणें, मोडणें, जाणणें, बांधणें) बद्ध होत नाहीं. भूतचेष्टा गभस्ती घेपवेना = जसा सूर्य जगाचा प्रकाशक असून प्राण्यांच्या कर्माचा लेप त्याला नाहीं-त्यांत सांपडत नाहीं (१८३).

तत्त्वज्ञान्यांच्या ठायीं प्रकृतिभाव तो नाहीं–जेथें का, ज्या प्रकृतीच्या पोटीं सर्व कर्म उत्पन्न होतें त्या प्रकृतीचा भाव-देहभाव–ज्ञानियांच्या ठिकाणीं नसतो (१८१).

ते देहबुद्धि टाकून, देहाभिमान सांडुनी प्रकृतीपासून झालेले गुण-त्रिगुण व त्यांचीं कर्मे ओलांडून, गुणकर्मांचे द्रष्टे होऊन, केवळ प्रकृतीचा द्रष्टा अशी स्थिती पावून-देहीं वर्ततात. (१८२)

—म्हणून शरीरधारी-देहधारी-जरी होऊन असतात तरी कर्मबंधनानें बद्ध होत नाहींत; कर्मबंधास आकळत नाहींत-जसा सूर्य जगाचा प्रकाशक असून प्राण्यांच्या कर्मांचा लेप त्याला लागत नाहीं. (१८३)

प्रकृतेर्गुणसंमूढाः सज्जन्ते गुणकर्मसु ।
तानकृत्स्नविदो मन्दान्कृत्स्नविन्न विचालयेत् ॥ २९ ॥

[प्रकृतेर्गुण = प्रकृतीच्या गुणांनीं. गुणकर्मसु = इंद्रियांच्या विषयोपभोगरूप कर्मांत. सज्जते = आसक्त होतात. मन्दान् = मंद बुद्धीच्या पुरुषास. अकृत्स्नविदः = अर्धवट, अविवेकी. (कृत्स्न = समस्त. विश्वमशेषं कृत्स्नं समस्त निखिलाखिलानि निःशेषम् समग्रं सकलं पूर्णम् खंडं अनूनके इति १२ समग्रस्य ।]

**अन्वय:** प्रकृतेर्गुणसंमूढा गुणकर्मसु सज्जन्ते तान् अकृत्स्नविदः मन्दान् कृत्स्नवित् न विचालयेत् ।

**अर्थ:** मनुष्य हा देहाभिमानच घेऊन बसला, तर त्याला विषयभोग हेच आसक्त करून टाकतात. जो योगमार्गानें जाणारा, त्यानें अशांचा गैरसमज काढून टाकावा (२९).

येथें कर्मीं तोचि लिंपे । जो गुणसंभ्रम घेपे ।
प्रकृतीचेनि आटोपें । वर्तत असे ॥ १८४ ॥

इंद्रियें गुणाधारें । राहाटती निजव्यापारें ।
तें परकर्म बलात्कारें । आपादिजे ॥ १८५ ॥

येथें-येथ. गुणसंभ्रम-गुणसंभ्रमें = जो भ्रमानें गुणाचीं कर्मे आपल्यावर घेतो. आटोपें = स्वाधीन, तंत्रानें (१८४). आपादिजे-आपादी जो (१८५).

त्या कर्मानें तोच लिंपला होतो, जो का गुणसंभ्रमें घेपे-भ्रमानें गुणकर्मे आपल्यावर घेतो-भ्रमानें गुणकर्मे आपल्या ठिकाणीं घेऊन असतो; तो प्रकृतीच्या स्वाधीनतेनें-तंत्रानें-वर्तत असतो. (१८४)

इंद्रियें गुणांच्या आधारानें, निजव्यापारानें राहाटणारीं तीं-तेथें हा तर तें दुसऱ्यांचें कर्म बळेंच आपल्या अंगावर घेतो-स्वीकारतो. (१८५)

मयि सर्वाणि कर्माणि संन्यस्याध्यात्मचेतसा ।
निराशीर्निर्ममो भूत्वा युद्ध्यस्व विगतज्वरः ॥ ३० ॥

[अध्यात्मचेतसा = अध्यात्मज्ञानानें शुद्ध होत चाललेल्या अंतकरणाच्या द्वारें. सर्वाणि कर्माणि = यच्चयावत् सर्व कर्मे. मयि संन्यस्य = मज परमेश्वराचे ठायीं समर्पण करून. निराशीः = आशारहित. निर्ममो = ममतारहित. भूत्वा = होऊन. विगतज्वर = शोकमोहरहित होत्साता. युद्ध्यस्व = युद्ध कर.]

**अन्वय:** अध्यात्मचेतसा सर्वाणि कर्माणि मयि संन्यस्य निराशीर्निर्ममो भूत्वा विगतज्वर युद्ध्यस्व ।

**अर्थ:** शुद्ध बुद्धीनें नियंत्रित केलेल्या अंतःकरणाच्या (मनाच्या) योगानें इंद्रियांकडून घडणारीं सर्व कर्मे माझ्या-परमेश्वराच्या ठायीं-ठिकाणीं समर्पण करून, फलाशारहित व ममताशून्य होऊन, शोकमोहरहित होत्साता शांत चित्तानें-युद्ध्यस्व-कर्तव्याचरण कर (३०).

**तरी उचित कर्में आघवीं । तुवां आचरोनि मज अर्पावीं ।**
**परी चित्तवृत्ति न्यसावी । आत्मरूपीं ॥ १८६ ॥**

**हें कर्म मी कर्ता । कां आचरेन या अर्था ।**
**ऐसा अभिमान झणें चित्ता । रिघों देशी ॥ १८७ ॥**

**तुवां शरीरपर नोहावें । कामनाजात सांडावें ।**
**मग अवसरोचित भोगावें । भोग सकळ ॥ १८८ ॥**

**आतां कोदंड घेउनी हातीं । आरूढ पां इये रथीं ।**
**देईं आलिंगन वीरवृत्ती । समाधानें ॥ १८९ ॥**

**जगीं कीर्ति रूढवीं । स्वधर्माचा मान वाढवीं ।**
**हे या भारापासूनि सोडवीं । मेदिनी हे ॥ १९० ॥**

**आतां पार्था निःशंक होईं । या संग्रामा चित्त देईं ।**
**येथें हेंवांचूनि कांहीं । बोलों नये ॥ १९१ ॥**

तरी–तरि. आघवीं–आघविं. न्यसावी = ठेवावी, स्थिर करावी (१८६). हें **कर्म**–आणि हें कर्म. **या अर्था** = फळाच्या उद्देशानें. देशी–देसी (१८७). शरीरपर–शरीरपरा = देहात्मवादी (१८८). देईं–देयीं (१८९). जगीं–जगिं. रूढवीं–रूढविं. वाढवीं–वाढविं. हे या भारापासूनि–इया भारापासोनि. मेदिनी–मेदीनी = पृथ्वी (१९०). येथें–एथ. हेंवांचूनि = युद्धावांचून (१९१).

करितां उचित म्हणजे विहित कर्में सर्वच्यासर्व तीं तुवां आचरून मजला अर्पण करावीत. पण तेथें चित्तवृत्ती ती आत्मस्वरूपाच्या ठायींच विन्यासावी–योजावी, ठेवावी, स्थिर करावी. (१८६)

हें कर्म करणारा मी, ह्या कर्माचा कर्ता अथवा फळासाठीं–फळाच्या उद्देशानें–कर्म मी आचरेन, असा अभिमान चित्तामध्यें रिघूं देऊं नकोस हो! (१८७)

तुवां शरीरपर–देहात्मवादी–देहाधीन न होतां, तसेंच सर्व हेतु, कामना, इच्छाजातांचेंही न होतां–कामनाजात सांडावें; व मग समयोचित प्राप्त तें उचिततेनें सकळ भोग भोगावेत. (१८८)

आतां 'कोदंड' नावाचें धनुष्य हातीं घेऊन ह्या रथामध्यें आरूढ हो व शूर वृत्तीला समाधानानें आलिंगन दे! (१८९)

जगीं लौकिक रूढीचा करावा, स्वधर्मे आदरभाव महत्त्व वाढवावें; लोक अधर्माप्रत आलेले, जे धर्मापमानाखालीं दडपलेले त्यांस सोडीव. जगामध्यें कीर्ति वाढीव. स्वधर्माचा मान चालू कर. ही मेदिनी–पृथ्वी–(दुष्टांच्या) भारापासून सोडीव! (१९०)

पार्था, आतां निःशंक होऊन ह्या संग्रामामध्यें चित्त दे. येथें युद्धावांचून दुसरें कांहींही बोलों चालों नये! (१९१)

**ये मे मतमिदं नित्यमनुतिष्ठन्ति मानवाः ।**
**श्रद्धावन्तोऽनसूयन्तो मुच्यन्ते तेऽपि कर्मभिः ॥ ३१ ॥**

[श्रद्धावन्तः = आस्थापूर्वक व विश्वास ठेवून. अनसूयन्तः = दोषदृष्टि सोडून. नित्यम् = नित्य. मुच्यन्ते = मुक्त होतात.]

**अन्वय :** ये इदं मे मतम् मानवाः श्रद्धावन्तः अनसूयन्तः नित्यम् अनुतिष्ठन्ति। ते अपि कर्मभिः मुच्यन्ते।

**अर्थ :** जे लोक असूया–दोषैक दृष्टि सोडून, श्रद्धा म्हणजे परमेश्वरावर भरंवसा ठेवून माझें हें मत नेहमीं आचरतील किंवा आचरतात, ते देखील कर्मापासून म्हणजेच कर्मबंधनापासून मुक्त होतात. दोषैक दृष्टि ठेवून जे आचरण करितात ते कोणत्याहि ज्ञानास अपात्र होऊन, विचारशून्यतेमुळें ते बुडालेच असें समज (३१).

**हें अनुपरोध मत माझें । जिहीं परमादरें स्वीकारिजे ।**
**श्रद्धापूर्वक अनुष्ठिजे । धनुर्धरा ॥ १९२ ॥**

**तेही सकळ कर्मीं वर्तत । जाण पां कर्मरहित ।**
**म्हणोनि हें निश्चित । करणीय गा ॥ १९३ ॥**

अनुपरोध = निराबाध (१९२).

हे धनुर्धरा ! असें हें अनुपरोध, नच पीडा देणारे, निराबाध, निश्चित हेतु ज्यामध्यें, कुटिलपणा त्रास इत्यादि हेतु नाहींत–असें हें माझें स्पष्ट, सरळ मत–जिहीं–त्यांनीं सन्मानपूर्वक स्वीकारावें व पूर्ण निष्ठेनें आचरावें. (१९२)

ते सकळ कर्मामध्यें वर्तत असतां कर्मरहित असें जाण. म्हणून हें मत निश्चितपणें करणीय असें आहे. (१९३)

**ये त्वेतदभ्यसूयन्तो नानुतिष्ठन्ति मे मतम् ।**
**सर्वज्ञानविमूढांस्तान्विद्धि नष्टानचेतसः ॥ ३२ ॥**

[अभ्यसूयन्तः = असूया, मत्सर. निंदा = क्रोधी, अहंकारी, मत्सरी. मे मतम् = माझें पूर्वोक्त मत. न अनुतिष्ठन्ति = आचरीत नाहींत, रक्षण करीत नाहींत, धर्मकृत्यच एक असें करण्याचें करीत नाहींत, अनुसरत नाहींत. अचेतसः = अविवेकी. नष्टान् = नष्ट; जन्माला येऊन फुकट गेला. मूढान् = असर्वज्ञां, मूढांना. विद्धि = तूं समज. समग्र = अखिल, सर्वज्ञान.]

**अन्वय :** ये तु एतद् अभ्यसूयन्तः मे मतम् न अनुतिष्ठन्ति । तान् अचेतसः नष्टान् सर्व ज्ञान विमूढान् विद्धि

**अर्थ :** दोषैक दृष्टि ठेवून जे लोक सांगितल्याप्रमाणें आचरण करणार नाहींत, ते कोणत्याहि ज्ञानास अपात्र होऊन, ते बुडाले असेंच समज (३२).

**नातरी प्रकृतिमंत होउनी । इंद्रियां लळा देउनी ।**
**जें हें माझें मत अव्हेरुनी । वोसंडिती ॥ १९४ ॥**

**जे सामान्यत्वें लेखिती । अवज्ञा करुनी देखती ।**
**कां हां गा अर्थवाद म्हणती । वाचाळपणें ॥ १९५ ॥**

**ते मोहमदीं भुलले । विषयविखें घारले ।**
**अज्ञानपंकीं बुडाले । निभ्रांत मानीं ॥ १९६ ॥**

**जैसें शवाच्या हातीं दिधलें । देखें रत्न वायां गेलें ।**
**नातरी जात्यंधा पाहिलें । प्रमाण नोहे ॥ १९७ ॥**

**कीं चंद्राचा उदय जैसा । उपयोग नोहे वायसा ।**
**मूर्खा विवेक हा तैसा । रुचेल ना ॥ १९८ ॥**

**तैसे ते पार्था । जे मूर्ख या परमार्था ।**
**तयासि संभाषण सर्वथा । करावें ना ॥ १९९ ॥**

**म्हणोनि ते न मानिती । आणि निंदाहि करूं लागती ।**
**सांगें पतंग काय साहती । प्रकाशातें ॥ २०० ॥**
**पतंगा दीपीं आलिंगन । तेथें सोसी अचूक मरण ।**
**तेवि विषयाचरण । आत्मघात ॥ २०१ ॥**

प्रकृतिमंत होउनी = देहाभिमानी होऊन, प्रकृतीचें कार्य जे गुण त्यांचें कार्य आपल्यावर घेऊन. अव्हेरुनी वोसंडिती = तिरस्कारानें टाकतात (१९४). देखती–देखिती. कां हां गा–कां हां. अर्थवाद = स्तावक वाक्यच एक केवळ (१९५). मोहमदीं–मोहमदिरा. विषयविखें–विषयविषें. घारले = माजले. बुद्धि विषयविखें घारिली होते–(ओ. १५०। अ. १० वा). घारः = शिंपडणें. घार्तिक = घारगा. घर्घरः = कोंड्याचा अग्नि, जल-प्रवाहाचा आवाज, कमरेंतील दागिन्याच्या घागऱ्या (१९६). जैसें शवाच्या = देखें शवाच्या. देखे रत्न–जैसें का रत्न. पाहिलें–पाहलें = उजाडलें (१९७). कीं–कां. उपयोग–उपयोगा. नोहे–न वचे. वायस = कावळा. रुचेल ना–रुचेलना (१९८). तैसे ते पार्था–तैसा जे पार्था. जे मूर्ख या परमार्था–विमुख या परमार्था. संभाषण–भाषण. करावें ना–करावें या (१९९). लागती–लाहाती. साहती–साहाति (२००). दीपीं–दिपीं. तेथें सोसी–तेथ त्यासि. आत्मघात–आत्मघाता (२०१).

अथवा प्रकृतिमंत होऊन व इंद्रियांना लाड, लळा देऊन जे का हें माझें मत अव्हेरून ओसंडतील, टाकून देतील, टाकतात— (१९४)

जे हें सामान्यत्वेंच–सर्वसाधारण, मध्यम, साधारण धर्म कीं गणतील, मानतील, मानतात, लेखतात; व अवज्ञा करून देखतील, देखते होतील व हा नुसता अर्थवाद–अतिशयोक्तिपूर्ण वाद आहे असें म्हणतील–(अभिधेयोवाच्यः राः धनम् वस्तु तत्त्वम्, निवृत्ति निर्वर्तनम् । अप्रविषयेदप्यर्थः ।) (१९५)

ते मोहरूपी वारुणीनें भुललेले, विषयरूपी विषानें घेरिले–वेढिले(घारले), अज्ञान, अविद्यारूपी चिखलामध्यें बुडाले, असें (पंचक्लेशी बुडाले..अंग) निःसंशयतेनें मानच–जाण, समज. (१९६)

असें पाहा कीं, लक्षांत घे कीं–शवाच्या हातीं दिलेलें रत्न जसें वायांच कीं गेलें ना? अथवा जात्याच जो अंध त्यास उजाडलें असें म्हटलें तर तेथें प्रमाण कांहींच सांपडणारे नव्हें! (१९७)

चंद्राचा उदय हा वायसाच्या–कावळ्याच्या–उपयोगाचा नाहीं; उपयोगास येत नाहीं. त्याप्रमाणें विवेक येत नाहीं–त्याप्रमाणें मूर्ख, धूर्त जे आहेत त्यांना केव्हांही रुचणारा नव्हेंच–नच रुचणारा कीं! (१९८)

त्याप्रमाणें हे पार्था! जे ह्या परमार्थास विमुख त्यांसीं कधींही सर्वथा भाषण, संभाषण करूंच नये कीं!—(१९९)

आणि म्हणून या कारणास्तव जे का येथें नच बोलणें भाषण इत्यादि तें (तत्त्व हें) मानीतच नाहींत व निंदाहीपण करूं लागतात–सांग कीं, पतंग काय प्रकाशास सहन करूं शकतात?—शकतील? साहतात? साहणारे होतील? (२००)

प्रकाश न साहणारे पतंग ते दीपास आलिंगन देऊं गेल्यानें तेथें पतंगास मरण तें अचूक, बिनचूक येणारें, वोढवणारें असें केव्हांही जसें; त्याप्रमाणें विषयामध्यें आचरण तें, वर्तणुक ती–आत्मघातच कीं म्हटलें–आत्मघातरूपी विषयाचारानें अचूक मरण वोढवणारे, येणारे········· (२०१)

**सदृशं चेष्टते स्वस्याः प्रकृतेर्ज्ञानवानपि ।**
**प्रकृतिं यान्ति भूतानि निग्रहः किं करिष्यति ॥ ३३ ॥**

[ज्ञानवान् = विवेकी पुरुष. चेष्टते = वर्तन करीत असतो. भूतानि = अखिल प्राणिमात्र. किम् = काय. करिष्यति = करील. निग्रहः = निश्चय.]

**अन्वय :** ज्ञानवान् अपि स्वस्याः प्रकृतेः सदृशं चेष्टते भूतानि प्रकृतिं यान्ति किम् करिष्यति निग्रहः ।

**अर्थ :** ज्ञानी मनुष्य देखील आपल्या प्रकृतिस्वभावाप्रमाणें वागतो. सामान्यतः प्राणिमात्र प्रकृतिवश होतात; मग कर्मचेष्टेच्या विषयांचा निग्रह, विषयांचा प्रतिबंध तो काय करणार? भूतमात्र प्रकृतीचे होतात; तेथें प्रतिबंध करून काय उपयोग होणार! (३३)

**म्हणोनि इंद्रियें (येकें) एकें । जाणतेनि पुरुषें ।**
**लळावीं ना कौतुकें । आदिकरुनी ॥ २०२ ॥**

**हां गा सर्पेसीं खेळों येईल । कीं व्याघ्रसंग सिद्धी जाईल ।**
**सांगें हळाहळ जिरेल । सेविलें (कायी) काई ॥ २०३ ॥**

**देखें खेळतां अग्नि लागला । मग तो न सरे जैसा उधवला ।**
**तैसा इंद्रियां लळा दिधला । भला नोहे ॥ २०४ ॥**

**येऱ्हवीं तरी अर्जुना । या शरीरा पराधीना ।**
**कां नाना भोगरचना । मेळवावी ॥ २०५ ॥**

**आपण साहसें करुनि बहुतें । सकळहि समृद्धिजातें ।**
**उदयास्त या देहातें । प्रतिपाळावे ॥ २०६ ॥**

**सर्वस्वें शिणोनि येथें । अर्जवावीं संपत्तिजातें ।**
**तेणें उदयधर्म सांडुनी देहातें । पोषावें काई ॥ २०७ ॥**

**मग हें तंव पांच मेळावा । सेखीं अनुसरेल पंचत्वा ।**
**ते वेळीं गेला कें गिंवसावा । शीण आपला ॥ २०८ ॥**

**म्हणोनि केवळ देहभरण । तें जाण उघड नागवण ।**
**यालागीं तेथें अंतःकरण । देयावेंना ॥ २०९ ॥**

पुरुषें-पुरुखें. लळावीं ना—लाळावीं ना (२०२). व्याघ्रसंग—व्याघ्रसंसर्ग. सेविलें काई-सेविलिया काई. कीं—किं (२०३). उधवला = भडकला असता. न सरे-न सावरे (२०४). येऱ्हवीं-येरवीं. पराधीना = गुणांच्या आधीन असलेल्या शरीराच्या सुखासाठीं. भोगरचना = विविध विषयभोग (२०५). साहसें करुनि-सायासेंकरूनि = परिश्रमेंकरून. उदयास्त = सूर्योदयापासून सूर्यास्तापर्यंत. प्रतिपाळावे-प्रतिपाळावें कां (२०६). येथें-एथें. अर्जवावीं = मिळवावीं. उदयधर्म-स्वधर्म. पोषावें-पोखावें (२०७). सेखीं-शेखीं. पांच मेळावा = पंचमहाभूतांचा संघात. गिंवसावा = सांपडावा, शोधावा (२०८). म्हणोनि-म्हणूनि. देहभरण = शरीराचें पोषण. जाण-जाणें. उघड नागवण—उघडी नागवण = आपली स्पष्ट फसवणूक, हानि (२०९).

म्हणून जाणत्या पुरुषानें कौतुकादिकेंकरून इंद्रियें लाडवावींत ना—लळावीं ना! (२०२)

अहो, काय सर्पाबरोबर खेळतां येईल? अथवा व्याघ्रसंसर्ग सिद्धीचा होईल काय? सांगा कीं, हलाहल विष जर सेविलें तर तें काय जिरणारें होईल?—जिरणारें नव्हेंच! (२०३)

आणखीही कांहीं प्रमाणें तीं काय—अहो, खेळतां खेळतां आग लागली व मग अग्नि असा भडकला—इतका वाढला कीं तो सावरणें कठीण होतें—त्याप्रमाणें इंद्रियांना लळा दिला तर तें भलें नव्हे! (२०४)

हे अर्जुना, या पराधीना शरीरा—गुणाधीन शरीराच्या सुखासाठीं—कशास ते अनेकविध, विविध विषयभोग मिळविण्याचें करावें! अहो! भोगरचना ती, शरीरा पराधीना ती कां? कशास बरें? (२०५)

अहो, ह्या गुणांच्या आधीन असलेल्या ह्या शरीराकरितां सूर्योदयापासून सूर्यास्तापर्यंत खपून ह्या देहास प्रतिपाळावें करावें. (२०६)

तेथें स्वतःचें सर्वस्वच शिणविलें करून संपत्तिजातें मिळवावीं, अर्जवावीं, ज्यानें का तेथें त्यानें आपला स्वधर्म सांडून, देहातेंच एका पोसावें तें कां बरें नच!—गळेलठ्ठतेची पुण्याई ती घ्यावी कीं! (२०७)

अहो, पण असें जाणा कीं–हा पृथ्वी, आप, तेज, वायु व आकाश ह्या पंचभूतांचा संघात जो पंच मेळावा देह शेवटीं पंचत्वास अनुसरणारा–अनुसरेल–तेथें त्या पांचांतच मिळून जाईल ना? त्यास मरण प्राप्त होईल ना? तेव्हां मग कसचा तो आपला शीण परत मिळविणारा, सांपडणारा–तो शोधावा कुठें बरें मग! (२०८)

या कारणास्तव फक्त एका ह्या केवळ शरीराचें पोषण तें उघड उघड हानीच–फसवणूकच! म्हणून इथें अंतःकरण केवळ देहभरण–पोषणासाठीं देऊं नये. (२०९)

इन्द्रियस्येन्द्रियस्यार्थे रागद्वेषौ व्यवस्थितौ ।
तयोर्न वशमागच्छेत्तौ ह्यस्य परिपन्थिनौ ॥ ३४ ॥

[व्यवस्थितौ = नीट लावलेले, ठराविक, निश्चित केलेले, निश्चित. रागद्वेष = (कामक्रोध, शोकमोह) प्रीतिद्वेष हीं द्वंद्वें. इन्द्रियस्य इन्द्रियस्य अर्थे = इन्द्रिया इन्द्रियांच्या अर्थामध्यें. न वशम् आगच्छेत् तयोः = त्यांच्या हेतूस वश होऊं नये–त्यांच्या आधीन जाऊं नये. तौहि अस्य परिपन्थिनौ = ते दोन राग व द्वेष हे ह्या ज्ञानाचे–साधक पुरुषाच्या उन्नतावस्थेचे–वाटमारे होत.]

**अन्वयः** रागद्वेषौ व्यवस्थितौ इन्द्रियस्य, इन्द्रियस्य अर्थे तयोः न वशम् आगच्छेत् तौ हि अस्य परिपन्थिनौ ।

**अर्थः** शब्दादि विषयांविषयीं इंद्रियांची आवड-निवड निसर्गसिद्ध असते; परंतु ह्या दोन्हींच्याहि आधीन होऊं नये. कारण रागद्वेष हे जीवाचे व ह्या जीविताच्या उच्च ध्येयाचे विघातक असे शत्रू असतात. (प्रत्येक इंद्रियाचे जे शब्दादि विषय त्यांविषयीं इंद्रियांचे प्रीतिद्वेष, आवड-निवड भावना ठरलेल्या–निसर्गसिद्ध–आहेत. त्या रागद्वेषाच्या स्वाधीन आपण होऊं नये; ते दोघेही साधकाचा–उन्नतावस्थेच्या पुरुषाचा–मार्ग अडविणारे घातक शत्रू आहेत) (३४).

येऱ्हवीं इंद्रियांचिया अर्था- । सारिखा विषय पोषितां ।
संतोष करुनियां चित्ता । आपजेल ॥ २१० ॥

परि तो संवचोराचा सांगातु । जैसा नावेक (स्वस्छु) स्वस्थु ।
जंव नगराचा प्रांतु । सांडिजेना बापा ॥ २११ ॥

विषाची मधुरता । आणि आवडी उपजे चित्ता ।
तो परिणाम न विचारितां । शेवावेना ॥ २१२ ॥

देखें इंद्रियीं काम असे । तो लावी सुखदुराशे ।
जैसा गळीं मीन आमिषें । भुलविजे कां ॥ २१३ ॥

तयामाजी गळ आहे । जो प्राणातें घेउनी जाये ।
तैसा ठाउका नोहे । झांकळलेपणें ॥ २१४ ॥

**तैसें अभिलाषें येणें किजेल । विषयाची आशा धरिजैल ।**
**वरी वरपड्या होईल । क्रोधानळा ॥ २१५ ॥**

**जैसा कवळुनियां पारधी । घातेचिये संधी ।**
**आणि मृगातें बुद्धि । साधावया ॥ २१६ ॥**

**येथ तैसीचि परि आहे । म्हणोनि संग हा तु नोहे ।**
**पार्था दोनी कामक्रोध हे । घातक जाणैं ॥ २१७ ॥**

**म्हणोनि आश्रयचि न करावा । मनेंही आठव न धरावा ।**
**एक निजवृत्तीचा वोलावा । नासों नेदीं ॥ २१८ ॥**

येन्हवीं–येन्हविं. इंद्रियान्चिया–ईंद्रियांचिया. अर्थासारिखा = इंद्रियांना आवडेल तसा, इंद्रियांना अनुकूल. पोषितां = सेवितां. करुनियां–का रे. आपजेल = प्राप्त होईल (२१०). संबचोराचा सांगातु–सांगात = संभावित चोराची–भामट्याची संगत. नावेक = क्षणभर. स्वस्थु–स्वस्थ. प्रांतु–प्रांत (२११). विषाची मधुरता–बापा! विषाची मधुरता. झणि–झणें. न विचारितां–विचारितां. शेवावेना–प्राण हरी (२१२). सुखदुराशे = सुखाची दुष्ट आशा. भुलविजे कां–भुलविजे गा (२१३). गळ–गळु. घेउनी–घेऊनि. तैसा–जैसा. ठाउका-ठाउवा नोहे. झांकळलेपणें–झांकलेपणें (२१४). किजेल–कीजेल. धरिजैल–धरिजेल. वरी–तरी. वरपड्या–वरपडा = स्वाधीन. होईल–होईजेल (२१५). कवळुनियां–कवळोनियां. घातेचिये संधी = मृगाला पकडण्याचा हेतु सिद्ध करण्यासाठीं. आणि–आणी (२१६). येथ–एथ. म्हणोनि–म्हणूनि. तु–तुज. जाणैं–जाणें (२१७). म्हणोनि–म्हणऊनि. आश्रयचि–आश्रयोचि. आठव–आठवो. निजवृत्तीचा वोलावा = आत्मानुसंधानाचा जिव्हाळा (२१८).

कां बरें तेथें संतोष (संतोष × संताप) प्राप्त होईल!–उपजेल? जे का इंद्रियाच्या अर्थासारखा उपजेल, जे का इंद्रियाच्या अर्थासारखा–इंद्रियांना अनुकूल–इंद्रियांना आवडेल तसा विषय सेवनांनीं करून देह हा पोषिला, तर तेथें मन जें चाचल्याचें तेंच जसें माजवलें होईल! चित्त (चित्त तु ने तो हृदयं स्वान्त हृन्मानसं मनः ।) तें तर मुळींच सांपडणारें नच झाल्यानें, त्या चित्तानें तेथें संतोषास येणें कसचें तें! (२१०)

—आणि म्हणून तेथें एका चोराचीच संगत केली असें होतें. जे का संभावितपणाचा डौल मिरविणाऱ्या–डौल आणणाऱ्या भामट्याची संगत ती क्षणमात्राचीच जशी; कारण तो वेशीच्या बाहेर–देहरूपी नगराच्या बाहेर जाईपर्यंतच ठीक! (२११)

बाप्पा अहो! विषाची मधुरता ती लगेंच चित्तात आवडी उपजवते–पण परिणाम जर विचारला तर प्राण हरण होणारे जसे! (२१२)

इंद्रियांच्या ठायीं काम असतो तो सुखाची दुष्ट आशा वाढवितो–मासा गळाला लावलेल्या मांसाच्या तुकड्याला जसा भुलतो—(२१३)

पण त्यामध्यें गळ आहे–जो प्राण घेऊन जाईल–तो गळ कांहीं इच्छा, प्रेमाच्या अभिलाषाच्या वेगामुळें झांकलेलें, झांकलेपणामुळें–अदृश्यतेमुळें–होणें झाल्यानें, ठाउका होत नाहीं! (२१४)

त्या अभिलाषानें तसें केलेंच (करावें) होईल. विषयाची आशा धरलीच–धरावी होईल. तरी मग क्रोधरूपी अग्नीच्या–अनळाच्या स्वाधीन होआवें–होइजेल, होणें होईल—(२१५)

जसा मृगाला पकडण्याचा हेतु साधण्यासाठीं–सिद्ध करण्यासाठीं, बुद्धि-युक्तीनें साधावयास–पारधी मृगाला मारण्याची संधी साधून, व्यापून, कवळून त्यास घाताच्या संधींत आणतो—(२१६)

इथें तत्त्वीच कीं परी म्हणजे प्रकार, तऱ्हा, रीती आहे. म्हणून विषयाचा संग हा तुज न होवो हे पार्था! हे दोन्ही काम व क्रोध घातक मारेकरी जाण-असे प्रहार, वध, संहार, उच्छेद, नाश करणारे—(२१७)

याकरितां हा आश्रय नच तेथचा करावा, मनानेंसुद्धां आठवण-आठव न धरावा, एक आत्मानुसंधानाचा जिव्हाळा, निजवृत्तीचा ओलावा विसरूं नये-नासूं न द्यावा, नाहींसा होऊं न द्यावा. (२१८)

श्रेयान्स्वधर्मो विगुणः परधर्मात्स्वनुष्ठितात् ।
स्वधर्मे निधनं श्रेयः परधर्मो भयावहः ॥ ३५ ॥

परधर्मात् स्वनुष्ठितात् = परधर्माचें आचरण उत्तम प्रकारें केलें-सुलभ वाटलें. त्यापेक्षां विगुणः स्वधर्मः श्रेयः = आपला सदोष, गुणहीन, निष्फळ वाटणारा स्वधर्म (नित्ययज्ञ) श्रेयस्कर होय-अधिक चांगला होय-उत्तम, शुभ, कल्याणकारक होय-तें पुण्यसाधन का मोक्षच होय. परधर्मः = दुसऱ्याचा धर्म. भयावहः = (भयानकः = रसविशेष, भय, राहु, वाद्य, भयंकर) धोक्याचा.

**अन्वय:** परधर्मात् सु अनुष्ठितात्- । स्वनुष्ठितात् विगुणः स्वधर्मः श्रेयान् । निधनं स्वधर्मे श्रेयः । भयावहः परधर्मः ।

**अर्थ:** वैगुण्यतेचा असा (कठीण) स्वधर्मच श्रेयस्कर होय. परंतु अनुष्टित परधर्मापेक्षां स्वधर्मातच स्वभावधर्मातच निधन होणें (मरणें) हें श्रेय म्हणजे श्रेष्ठ असें आहे. परधर्म हानीकारक असा धोक्याचा असतो-(म्हणून स्वधर्मामध्यें मरण देखील बरें, इंद्रियांच्या गुणाचें होणें हें केव्हांही भयाचें असेंच असतें) (३५).

अगा स्वधर्म हा आपुला । जऱ्हि कां कठिण जाहला ।
तऱ्हि हाचि अनुष्ठिला । भला देखें ॥ २१९ ॥
येर आचार जो परावा । तो देखतां कीर बरवा ।
परि आचरतेनि आचरावा । आपलाचि ॥ २२० ॥
सांगें शूद्रगृहीं अघवीं । पक्वान्नें अहाती बरवीं ।
तें द्विजें केविं सेवावीं । दुबळा जऱ्ही ॥ २२१ ॥
हें अनुचित कैसें कीजे । अग्राह्य केविं इच्छिजे ।
अथवा इच्छिलेंही पाविजे । विचारीं पां ॥ २२२ ॥
तऱ्ही लोकांची धवळारें । देखोनियां मनोहरें ।
असतीं आपलीं तणघरें । मोडावीं केवीं ॥ २२३ ॥
हें असो वनिता आपली । कुरूप जऱ्ही जाली ।
तऱ्ही भोगितां तेचि भली । जयापरी ॥ २२४ ॥
तेविं आवडे तैसा सांकडु । आचरतां जऱ्ही दुर्वाडु ।
तऱ्ही स्वधर्माची सुरवाडु । परत्रींचा ॥ २२५ ॥
हां गा साखर आणि दूध । हें गौल्य किरे प्रसिद्ध ।
परि कृमिदोषीं विरुद्ध । घेपे केवीं ॥ २२६ ॥
ऐसेनिही जरी सेविजेल । तरी ते आळुकींचि उरेल ।
जे तें परिणामीं मिथ्या नव्हेल । धनुर्धरा ॥ २२७ ॥
म्हणोनि आणिकांशी जें विहित । आणि आपणपेयां अनुचित ।
तें नाचरावें जऱ्ही हित । विचारिजे ॥ २२८ ॥

**या स्वधर्मातें अनुष्ठितां । वेच होईल जीविता ।**
**तोही निका वर उभयतां । दिसतसे ॥ २२९ ॥**
**ऐसें समस्तसुरशिरोमणि । बोलिले जेथ शार्ङ्गपाणि ।**
**तेथ अर्जुन म्हणे विनवणि । असे देवा ॥ २३० ॥**
**जें हें तुम्हीं सांगितलें । तें सकळ कीर म्यां परिशिलें ।**
**परि आतां पुसेन कांहीं आपलें । अपेक्षित ॥ २३१ ॥**

जन्हि–जरी. तन्हि–तरी. देखैं–देखें. अनुष्ठिला = आचरला; मागून उभें राहणें; रक्षण केला, पाळला, अनुसरला (२१९). येर–येरु = अन्य. आपलाचि–आपुलाचि. परावा = दुसऱ्याचा, पराचा (२२०). शूद्रगृहीं–शूद्रघरीं. अहाती–आहाती. बरवीं–बरविं. तें–तीं. केविं–केवीं. सेवावीं–सेवाविं. दुबळा जन्ही–दुबळा जरी जाहला (२२१). कैसें–कैसेनि. कीजे–किजे. केविं ईच्छिजे–केवीं इच्छिजे. इच्छिलेंही–ईच्छिलेंहि. विचारीं पा–विचारी पां (२२२). तन्ही–तरी. धवळारें = चुनेगच्ची घरें. आपलीं–आपुलीं. तणघरें–तणारे = तृणाचीं घरें, गवताच्या झोंपड्या (२२३). आपली–आपुली. जन्ही–जरी. जाली–जाहली. जयापरी–जियापरी. कुरूप = कु = शब्द करणें, कण्हणें, रडणें, वाईट, अल्प, निंद्य. रूप = साजेसें, आकार, चेहरा, स्वरूप, लक्षण, बाह्यरंग आकार, सौंदर्य, रुपया. रूपवान् = मूर्तिमंत, सुंदर, मूर्त (जनितोप्यन्तानुरागो यस्यांतस्यायोषिन्मात्रेच वनिता।) (२२४). तेविं–तेवीं. आवडे तैसा सांकडू = वाटेल तितका कठीण असला–पाहिजे तेवढा जरी कठीण असला. दुर्वाडू–दुर्वाड = दुर्घट. (दुवाड = द्वाड. दुआड = कठीण, दुस्तर, भयंकर, गाई दुआड सिंग.) तन्ही–तरी. स्वधर्माची–स्वधर्मचि. सुरवाडू–सुरवाड. परत्रींचा–परत्रीचा (२२५).

गौल्य–गौल्ये = गोडी, माधुरी. किरे–कीरे. परि–परी. केवीं–केविं. घेपे कृमिदोषीं विरुद्ध = पोटांत जंत झालेल्या रोग्यांनीं–कां घ्यावी बरें! (२२६). आलुकीचि उरेल = हटवादीपणाच एक म्हटला पाहिजे. मिथ्या–पथ्य. परिणामीं–परिणामिं. आलुकी = आवड, इच्छा (२२७). आणिकांशी–आणिकांसी. जन्ही–जरी. आपणपेयां अनुचित तें नाचरावें जन्ही हित = स्वतःला अयोग्य असें तें हित विचारिजे–तरी आचरूं नये (२२८). वेच–वेचु (वेंच = नाश. दिसतसे–दिसत असे. तोही निका वर उभयतां = तर तो उभयलोकीं–अरत्र–परत्र–ईह–पर–श्रेष्ठच ठरतो (२२९). समस्तसुरशिरोमणि = श्रेष्ठ रत्न, समस्त देवांमधीलचे श्रेष्ठ. शार्ङ्गपाणि–श्रीशार्ङ्गपाणि. (शिंगाचें धनुष्य–श्रीविष्णूचें एक शस्त्र) (२३०). जें हें–हें जें. परि आतां–तरि आतां. आपलें–आपुलें. अपेक्षित = आशा, अपेक्षा, जरुरी (२३१).

आपला आवडता धर्म कठीण जरी का जाहला–अडचणींचा व त्रासाचा वाटला–तरीपण तोच–तोच आचरणें बरें! (तन्हि अनुष्ठिला भला देखैं) (२१९)

दुसरा जो परावा, परक्याचा (धर्म) तो दिसण्यांत वरवर बरा वाटला, तरीपण आचरणाऱ्यानें तर आपलाच (धर्म) आचरावा कीं– (२२०)

असें पाहा कीं, सांग कीं, ब्राह्मण दरिद्री असला म्हणून काय त्यानें शूद्राच्या घरच्या पक्वान्नावर ताव मारावा? (२२१)

शूद्राघरीचीं पक्वान्नें द्विजांनीं सेवन करावींत? असलें हें अयोग्य तें नच करावें–कसें बरें तें उचित होईल? अहो, जें अग्राह्य तें कां बरें इच्छावें? अथवा इच्छिलें तेंचि ते पावावें, गांठावें, मिळवावें, पोहोंचावें, असें हें विचार करून पाहा. (२२२)

असें जर नाहीं तर मग लोकांचीं चुनेगच्ची घरें पाहून आपलीं राहातीं गवताचीं घरें केविं मोडावींत तीं? आपली झोंपडी पाडून टाकावी काय? (२२३)

ज्याप्रमाणें आपली स्त्री, पत्नि, वनिता जरी कुरूप असली तरी तीच भोगावी हेंच बरें–यातच भलेपणा आहे!– (२२४)

त्याप्रमाणें भलताच कठीण व आचरण्यास–आचरतां जरी (द्वाड) दुर्घट, तरी परलोकींचा सुखकर सखा स्वधर्मच एक कीं! (२२५)

अहो, साखर व दूध हें गौल्यें–गोडीनें माधुर्याविषयीं प्रसिद्ध; पण ज्याला जंताची व्याधी आहे त्यांनीं तें कसें घ्यावें? कारण साखर व दूध कृमिदोषीं विरुद्ध असें! (२२६)

असें असूनसुद्धां जरी का सेविलेंच–आवड कीं एक उरेल–काय त्या व्याधीची म्हणावी! कारण काय, तर तें कांहीं पथ्यकर नव्हें–हितकर होणारें नव्हें! (२२७)

म्हणून याजकरितां जें दुसऱ्यांना विहित–योग्य व आपणा स्वतःला नच योग्य तें जर का हिताची गोष्ट विचारायची–तर आचरूं नये. (२२८)

ह्या स्वधर्मास अनुष्ठानाचें करितां करितां जीवित खर्चीं पडलें, तरी तेंही जीवास इहलोकीं श्रेष्ठपणाचें असें दिसणारें होत असतें– (२२९)

असे सर्व देवांचे शिरोमणी जे शारंगपाणी भगवान् श्रीकृष्ण बोलत आहेत तेथें अर्जुन म्हणत आहे कीं–अहो देवा! एक विनवणी आपणांस आहे कीं— (२३०)

हें जें कांहीं तुम्हीं सांगितलें तें सकळही म्यां ऐकिलें! तरीहीपण माझें जें कांहीं एक अपेक्षित असें मनांत आहे तें आपणास विचारावें, असें वाटतें. (२३१)

**अर्जुन उवाच—**

**अथ केन प्रयुक्तोऽयं पापं चरति पूरुषः।**
**अनिच्छन्नपि वार्ष्णेय बलादिव नियोजितः॥ ३६॥**

[वार्ष्णेय = हे कृष्णा. अथ = तर मग. अयं पूरुषः = हा (ज्ञानी) पुरुष. केन प्रयुक्तः = कोणाकडून प्रेरित होतो. पापं चरति = पापकर्माला प्रवृत्त होतो. नियोजितः = योजल्याप्रमाणें. बलात् = बलात्कारानें. अनिच्छन् = इच्छा नसतांना देखील.]

**अन्वय :** अर्जुन उवाच—वार्ष्णेय! अयं पूरुषः केन प्रयुक्तः अथ पापं चरति नियोजितः बलात् इव अनिच्छन् अपि।

**अर्थ :** अर्जुन म्हणाला, हे श्रीकृष्णा! तर मग हा मनुष्य स्वतःची इच्छा नसतानासुद्धां, जणुं कांहीं जबरीनें ढकलल्यासारखा कोणाच्या प्रेरणेनें पापाचरण करतो?–(म्हणजे विकारास घेतो बरें!) (३६).

**तऱ्ही देवा हें कैसें। जे ज्ञानियांचिही (स्थिति) स्थिति भ्रंशे।**
**मार्ग सांडुनि अनारिसे। चालत देखों॥ २३२॥**

**सर्वज्ञही जे होती। हे उपाय जाणती।**
**तेही परि धर्मीं व्यभिचरती। कवणें गुणें॥ २३३॥**

**बीजा आणि भुसा। अंध निवाडु नेणे जैसा।**
**नावेक देखणाही तैसा। बरळे कां पां॥ २३४॥**

**जे असतां संग सांडिती। तेचि संसर्ग करितां न धाती।**
**वनवासिही सेविती। जनपदातें॥ २३५॥**

**आपण तरी लपती । सर्वस्वें पाप चुकविती ।**
**परि बलात्कारें सुईजती । तयाचि माजी ॥ २३६ ॥**

**जयाचि जीव घेति विंवसी । तेचि जडोनि ठाके जीवेंसीं ।**
**चुकावितां ते गिंवसी । तयातेंचि ॥ २३७ ॥**

**ऐसा बलात्कार (येक) एक दिसे । तो कवणाचा येथ आग्रह असे ।**
**हें बोलावें हृषीकेशें । पार्थ म्हणे ॥ २३८ ॥**

तऱ्ही–तरी. स्थिति–आत्मस्थिति. अनारिसे = आडमार्गाला (२३२). उपाय–उपायही. सर्वज्ञही = सर्व जाणते. परि धर्मी–परधर्में = दुसऱ्या धर्मांत. (हेय उपादेय = टाकावें काय? स्वीकारावें काय?) व्यभिचरती = वावरतात. कवणें गुणें = कोणत्या कारणानें (२३३). कां पां–कांपां. नावेक देखणाही = क्षणभर सडोळसही (२३४). धाती–धाति = समाधान. वनवासिही–वनवासीही = दुःखित. जनपद = लोकवस्ती (२३५). बलात्कारें सुईजती तयाचि (पापाचि) माजी = जबरदस्तीनें पापामध्येंच घातले जातात. सर्वस्वें = सर्वथैव (२३६). विंवसी = कंटाळा. गिंवसी = घेरतात (२३७). येथ–एथ. आग्रह–आग्रहो (२३८).

तरी देवा, हें असें कसें हो! कीं ज्ञानियांची आत्मस्थिति चळते–ते तर मार्ग सोडून देऊन आडमार्गाला जात आहेत असे दिसतात! (२३२)

अर्जुन म्हणतो–(अहो देवा) सर्व जाणते जे आहेत ते टाकावें काय व स्वीकारावें काय हें जाणतात जरी तरीपण तेही दुसऱ्याच्या धर्मांत वावरतात याचें कारण काय? (परि धर्मीं व्यभिचरती कवणें गुणें) (२३३)

भूस व बीज यांचा निवाडा आंधळा कांहीं देऊं (करूं) शकत नाहीं! देखणा–डोळस, जाणता तोही क्षणभर आंधळ्यासारखाच कीं कां बरें वागतो तो? (२३४)

देहाचा संग जो तो ते सांडतात, देहबुद्धीस जे विटतात, तेच कीं आतां संसर्ग करितांही समाधान पावत नाहींत. वनांत राहणारे जे तेसुद्धां लोक वस्तींत येऊन मिळतात. (२३५)

आपण तर स्वतः लपतात, सर्वथैव पाप तें चुकवितात. पण अहो! जसें, का बलात्कारानेंच त्यांना त्या पापांत ढकललें जसें का असे–घातले जातात–तेथेंच त्या पापांतच पडतात. (२३६)

ज्याचा जीवानें त्रास–वीट–घेतलेला असतो तोच विषय अत्यंत दृढ होऊन बसतो; व त्या विषयाला चुकवायचा यत्न केला तरी तो त्याला गुरफटून घेतो. वासना, कामना हीच विंवसी कीं– (२३७)

असा बलात्कार येथें दिसतो आहे; तो कवणाचा आग्रह असतो, हें श्रीहृषिकेशानीं बोलावें असें पार्थ म्हणत आहे. (२३८)

**श्रीभगवानुवाच—**

**काम एष क्रोध एष रजोगुणसमुद्भवः ।**
**महाशनो महापाप्मा विद्धयेनमिह वैरिणम् ॥ ३७ ॥**

[रजोगुण समुद्भवः = रजोगुणापासून उत्पन्न होणारा. महाशनः = मोठा खादाड, अधाशी. महापाप्मा = मोठा पापी. इह = येथें, या लोकीं. वैरिणम् विद्धि = (वैरिन् = १. शत्रु, २. योद्धा.) शत्रु जाण–समज.]

**अन्वय :** एष कामः एष क्रोधः रजोगुणः समुद्भव महाशनः महापाप्मा इह वैरिणम् विद्धि एनम् ।

**अर्थ :** श्रीभगवान् म्हणाले— रजोगुणापासून उत्पन्न झालेला व प्रतिबंधनामुळें क्रोधात रूपांतर पावणारा हा काम (उपभोगेच्छा) अत्यंत खादाड–कितीही उपभोग मिळाले तरी तृप्त न होणारा व सर्व दुःखांना व अनर्थांना कारण होणारा, असा आहे. येथें, म्हणजे ह्या कर्मयोगांत तो साधकांचा वैरी आहे असें समज (३७).

तंव हृदयकमळआरामु । जो योगियांचा निष्कामकामु ।
तो म्हणतसे पुरुषोत्तमु । सांगेन आइक ॥ २३९ ॥

तरि हे कामक्रोध पाहीं । जयातें कृपेची सांठवण नाहीं ।
हे कृतांताच्या ठायीं । मानिजति ॥ २४० ॥

हे ज्ञाननिधीचे भुजंग । विषयदरीचे वाघ ।
भजनमार्गींचे मांग । मारक जे ॥ २४१ ॥

हे देहदुर्गींचे धोंड । इंद्रियग्रामींचे कैंड ।
याचे व्यामोहादिक दबड । जगावरी ॥ २४२ ॥

हे रजोगुण मानसाचे । समूळ आसुरियेचे ।
धायपणाचे । अविद्या केलें ॥ २४३ ॥

हे रजाचे कीर जाले । परी तमासि पढियंते भले ।
तेणें निजपद यांसि दीधलें । प्रमाद मोह ॥ २४४ ॥

हे मृत्युच्या नगरीं । मानिजती निकियापरी ।
हे जीविताचे वैरी । म्हणोनियां ॥ २४५ ॥

जयांसि भुकेलियां आमिषा । हें विश्वचि न पुरे घांसा ।
कुळवाडियांची आशा । चाळित असे ॥ २४६ ॥

कौतुकें कवळितां मुष्टी । जियें चौदा भुवनें थेकुटीं ।
तया भ्रांति हे धाकुटी । वाल्हीदुल्ही ॥ २४७ ॥

जें लोकत्रयाचें भातुकें । खेळतांचि खाया कौतुकें ।
तिच्या दासीपणाचेनि बिकें । तृष्णा जिये ॥ २४८ ॥

हें असो मोहें मानिजे । यातें अहंकारें घेपे दिजे ।
जेणें जग आपुलिये भोजें । नाचवीत असे ॥ २४९ ॥

तेणें सत्याचा भोंकसा काढिला । मग असत्यपणकुटा भरिला ।
तो दंभ रूढविला । जगीं इहीं ॥ २५० ॥

साध्वी शांती नागविली । मग माया मांगी शृंगारविली ।
तियेकरवीं विटाळविलीं । साधुवृंदें ॥ २५१ ॥

इहीं विवेकाची त्रय फेडिली । वैराग्याची खाल काढिली ।
जितिया मान मोडिली । उपशमाची ॥ २५२ ॥

इहीं संतोषवन खांडिलें । धैर्यदुर्ग पाडिले ।
आनंदरोप सांडिलें । उपडोनियां ॥ २५३ ॥

इहीं बोधाचीं रोपें लुंचिलीं । सुखाची लिपी पुसिली ।
जिव्हारीं अग्नि सूदिली । तापत्रयाची ॥ २५४ ॥

हे आंगा तंव घडले । जिवींची आथी अडले ।
परि न तुटत गिंवसिले । ब्रह्मादिकां ॥ २५५ ॥

हे चैतन्याचे शेजारी । असती ज्ञाना (येका) एका हारीं ।
म्हणोनि प्रवर्तती महामारी । सांवरती ना ॥ २५६ ॥

हे जळेंवीण बुडविती । आगीवीण जाळिती ।
न बोलत कवळिती । प्राणियांतें ॥ २५७ ॥

हे शस्त्रेंवीण साधिती । दोरेंवीण बांधिती ।
ज्ञानियांसि तरी वधिती । पैज घेउनी ॥ २५८ ॥

हे चिखलेंवीण रोंविती । पाशेंवीण गोंविती ।
हे कवणाजोगे नोव्हती । आंतुवटपणें ॥ २५९ ॥

आरामु–अरामु = रमविणारा. कामु–काम. पुरुषोत्तम = उत्तम पुरुष, परमात्मा (२३९). सांठवण = सांठा, सांटोवा. कामक्रोध = विषयवासना, द्वेष (२४०). ज्ञाननिधी = ज्ञानरूप ठेव. भुजंग = नाग, साप, जार. वाघ = दुष्ट सावज, श्रेष्ठ, व्याघ्र. भजनमार्गींचे–भक्तिमार्गाचे. मांग = मारेकरी (२४१). देहदुर्ग = देहरूपी किल्ला. धोंड = मोठाले दगड. ग्राम = गांव, समूह, समाज. केंड–कोंड = कोंडवाडे, डोह, गांवकुस. व्यामोह = गोंधळ, अज्ञान, भ्रम. दबड–बंड (दबड = भ्रांतीनें धाक घालून भ्रमच वाढता केला) (२४२). धायपणाचे–धायपण ययाचे. धाय = दाई, तृप्ति, हुंबरडा (२४३). जाले–जाहाले. कीर = पोपट. पढियंते = आवडते. प्रमाद मोह–प्रमाद–मोह = माजोरीपणा, बेसावधपणा, अविचारीपणा, मतिभ्रम (२४४). हे–जे. म्हणोनियां–म्हणउनियां (२४५). चाळित–चाळीत (२४६). मुष्टी–मुठी. चौदा–चवदा. थेकुटीं = अल्प, तुच्छ. तया–तिये. हे–ही. धाकुटी–धाकुटि. वाल्हीदुल्ही = लाडकी अशी. वाला–(वाल्हा) = प्रीतिपात्र, आवडता. वाल्हा = वाल्मिक. वाल्हे = आवडते, जीवलग. दुली = नवरी (२४७). खाया–खाय. जिये–जीये. बिर्के = आधारावर. तृष्णा = इच्छा (२४८). भोजें = हौसेनें. आपुलिये–आपुलिया (२४९). तेणें–जेणें. भोंकसा = कोथळा, भाता, आंतील गर्भ. असत्यपणकुटा–असत्यतृणकुटा (गवताचा पेंढा) (२५०). शृंगारविली–शृंगारिली. साध्वी = पतिव्रता. साधुवृंदें = साधूंचे समूह (२५१). त्रय–त्राय. खाल–साल = कातडी. उपशम = लय (२५२). खांडिलें = तोडलें. दुर्ग = किल्ले. उपडोनियां–उपडूनियां (२५३). लिपी–लिपाहि = नाव. लुंचिलीं = उपटलीं. अग्नि–आगी. सूदिली–सूदली = घातली (२५४). आथी–आथि. परि न तुटत–नातुडती = सांपडत नाहीं (२५५). चैतन्य = चेतना, जीवनकळा. असती–बसती. ज्ञाना–ज्ञानाच्या. एका हारीं–एकहारी = पंक्तीला. प्रवर्तणें = घडणें, सुरू होणें, आरंभ करणें. सावरती ना = आवरिले जात नाहींत (२५६). न बोलत–बोलता (२५७). साधिती–साधिति = साधून मारतात. तरी–तरि (२५८). नोव्हति–न होती. आंतुवटपणें = बळकटपणामुळें (२५९).

श्रीभगवान् म्हणतात—ही विषयवासना, हा काम, हा द्वेष, क्रोध, पाहा–जाण कीं–ज्याच्या ठायीं कृपेला रीघ नाहीं–कृपेचा सांटोवा नाहीं. हे तर यमाच्या जागीं मानले जातात! (२४०)

हे ज्ञानरूप द्रव्यावरचे नाग, विषयरूप दरींतील दुष्ट सावज, भक्तिमार्गाचा नाश करणारे मारेकरी जे का– (२४१)

हे देहरूप दुर्ग म्हणजे किल्ल्यातील धोंड–म्हणजे मोठाले दगड. हे इंद्रियरूपी गांवकुस, कोंडवाडे, डोह (तिन्ही अर्थ) तिहेरी असे. भ्रांति मोह आदिकरून ते जगावर परिणाम करणारे आभंडच! (२४२)

हे मानस म्हणजे मनाचे रजोगुण, समूळपणें आसुरी संपत्तीचे केलेले; यांचें पालन-पोषण अविद्येनें केलेलें आहे. (२४३)

हे रजापासून उत्पन्न झालेले, पण तमाचे आवडते दोस्त आहेत. त्या तमानें आपलें मोहाचें व प्रमादाचें पद त्यांना दिलें आहे. हे तमोगुणापेक्षांही जास्त पढियंते होत. (२४४)

मृत्यूच्या नगरामध्यें हे मित्रासारखे भले मानले आहेत; कारण काय, तर हे जीविताचे वैरी आणि म्हणूनच कीं…… (२४५)

ज्यांच्या भुकेलेपणाचें आमिष तेथें तर हें विश्वही त्यांच्या घांसास पुरतें पडेना! त्यांची कुळवाडी, देवघेव, व्यापार आशा ही करीत राहते. (२४६)

सहज कौतुकानें मुठींत कवळिलें, धरिलें (माकडें मुठीं धरिले फुटाणे)-जिला चौदाही भुवनें लहानच, तेथें भ्रांति हीच लाडकी अशी धाकटी बहीण कीं कवळणारी! (२४७)

भ्रांती ही—ही भ्रांती भातुकली खेळूं लागली कीं तीनही लोक खाऊन टाकते व तृष्णा हिच्या दासीपणाच्या बळावर (बिर्के) जगली आहे. (२४८)

मोह याच भ्रांति व तृष्णा ह्यांना फार मानतो. ह्यांचें अहंकारामुळेंच घेणें देणें होतें व आवडीप्रमाणें हा अहंकार नाचवीत असतो. (२४९)

ज्यानें का सत्याचें पोटच फोडलें व त्यांत असत्य तृण कुट भरिला व दंभ हाच ह्या जगीं रूढीचा केला—आरूढविला ……… (२५०)

शांती साध्वी ती लुबाडली गेली, नागविली गेली—मग माया अविद्या हीसच सर्व शृंगार केला व तिच्या-कडूनच कीं साधुवृंदें तीं दूषविलीं गेलीं—विटाळविलीं गेलीं कीं! (२५१)

ह्यांनीं विवेकाचा आश्रय नाहींसा केला. बारा युगांची साल अथवा खालचें सोलून काढिलीं व उपशमाची तर—ऐकणें जें जिवंत असणारें त्याची तर-मानच पार मोडून टाकिली! (२५२)

ह्यांनीं संतोषाचें वन तें पेटवून दिलें. धैर्यदुर्ग कोसळून टाकिले. आनंदाचें रोप जें तें तर फेंकून दिलें. (सांडिलें). (२५३)

ह्यांनीं बोधाचीं रोपटीं उपटिलीं. सुखाच्या लिपीचें नांवही पुसून टाकलें. जिव्हारीं-अंतःकरणांत—जे तापत्रय (अधिभौतिक, अधिदैविक, अध्यात्मिक) त्यांची आगच कीं एक घातली! (२५४)

हे देहाबरोबर घडलेले असून जीवाच्या अंगांतच राहातात, पण ब्रह्मादिकांनाही सांपडले असें केव्हांही गुह्यपणें आकळले होत नाहींत—स्पर्श केले जात नाहींत. (२५५)

चैतन्याच्या शेजारीं व ज्ञानाच्या पंक्तीला हे बसतात, आणि म्हणूनच तर जगाचा सत्यनाश करावयाला हे प्रवृत्त झाले असून कोणालाही सावरेनासे का आवरेनासे झाले आहेत! (२५६)

हे जळाशिवाय बुडवितात, अग्नीशिवाय पोळवितात, जाळतात. हे नच बोलतांच मुळीं मुकाट्यानें कीं कवटाळून घेतात! (२५७)

हे शस्त्राशिवाय मारतात, साधतात, दोराशिवाय बांधतात आणि ज्ञानियास तर पैजेवरच कीं वधतात! (२५८)

हे चिखलाशिवाय रोंवितात, पाशाशिवाय कीं गुंतवितात—बळकटपणामुळें हे कुणाचेही नव्हत! (२५९)

**धूमेनाव्रियते वह्निर्यथादर्शो मलेन च ।**
**यथोल्बेनावृतो गर्भस्तथा तेनेदमावृतम् ॥ ३८ ॥**

[**यथा** = ज्याप्रमाणें. **आदर्शः** = आरसा. **धूमेन** = धुरानें. **आव्रियते** = झांकला जातो. **उल्बेन** = (गर्भाचें वेष्टण), वारेनें. **तथा** = त्याप्रमाणें. **आवृतम्** = झांकलेलें. **इदम्** = ज्ञान हें. **तेन** (वैरिणा) = वैरी कामानें.]

**अन्वय :** यथा आदर्शः मलेन । यथा धूमेन वन्हिः । आव्रियत । यथा उल्बेन गर्भ आवृतः । तथा इदम् (ज्ञानम्) आवृतम् तेन (कामेण) ।

**अर्थ :** ज्याप्रमाणें धुरानें अग्नि आच्छादित होतो, मळानें जसा आरसा मलीन होतो किंवा झांकून जातो, अथवा वारेनें गर्भ जसा वेष्टित असतो. त्याप्रमाणें ह्या कामानें ज्ञान व्यापून टाकलें आहे (३८).

**जैसी चंदनाची मुळी । गिंवसूनि घेपे व्याळीं ।**
**नातरी उल्बाची खोळी । गर्भस्थासी ॥ २६० ॥**

**कीं प्रभाविण भानु । धूमेवीण हुताशनु ।**
**जैसा दर्पण मळीं हिनु । कहिंच न दिसे ॥ २६१ ॥**

**तैसें इहींविण एकलें । आम्हीं ज्ञान नाहीं देखिलें ।**
**जैसें कोंडेनि पांगुतलें । बीज निपजे ॥ २६२ ॥**

गिंवसूनि–गिंवसोनि = कवटाळून घेतली जाते. घेपे व्याळीं = सर्प वेढून टाकतो. उल्ब = वार, गर्भाची (पिशवी)–वेष्टण. खोळी = वेष्टण, खोळ (२६०). कीं–का. प्रभाविण–प्रभावीण. धूमेवीण = धुरावांचून. धूम = धूर, वाफ, धुकें. हुताशन = अग्नि. हुतअश, हुतवह, हुतनक्षत्र. मळीं हिनु–मळहीनु. कहिंच न दिसे–कांहींच नसे. मलिन = पाप, दोष, अपवित्र. दर्पण = आरसा, डोळा. मळहीनु = पाऱ्यावांचून. मळ = मलिन, घाणेरडा. (२६१) इहींविण = कामक्रोधाशिवाय. पांगुतलें–पां गुंतलें = आच्छादिलें. जसें कोंड्यानें आच्छादिलेलें बीज जसें निपजतें. आपाद पांगुंतले पुल कांचळे (२२६-११) परमाणु पांगुतले (२४९–१३) (२६२).

ज्याप्रमाणें चंदनाची मुळी सर्पानें कवटाळून घेतली जाते अथवा गर्भस्थास गर्भवेष्टनाची खोळ वेष्टून, आवरून, कवटाळून असते—(२६०)

प्रभेशिवाय सूर्य, धुराशिवाय अग्नि कसा तर तेथें कांहींच दिसणारें नाहीं. जसें का दर्पण म्हणजे आरसा-कांच मीनाच्या (पाऱ्याच्या) लेपाशिवाय असेल तर मलहीन, टाकलेले, मळामुळें निंद्य न्यून–मळकट-पणाशिवाय नच असा!—(२६१)

त्याप्रमाणें ह्या कामक्रोधाशिवाय एकटे असें ज्ञान आमच्या पाहण्यांत, देखण्यांत नाहीं. जसें बीज हें कोंड्यानें आच्छादिलेलें असेंच कीं निपजत असतें! (२६२)

**आवृतं ज्ञानमेतेन ज्ञानिनो नित्यवैरिणा ।**
**कामरूपेण कौन्तेय दुष्पूरेणानलेन च ॥ ३९ ॥**

[**ज्ञानिनः** = ज्ञानी पुरुषाचा. **नित्यवैरिणा** = अहोरात्र द्वेष करणारा, हाडवैरी. **आवृतम्** = आच्छादित. **कौन्तेय** = अर्जुना. **कामरूपेण दुष्पूरेण अनलेन च** = कधींही तृप्त न होणाऱ्या व कधींहि "न अलम् म्हणजे" पुरें असें न म्हणणाऱ्या अग्नीप्रमाणें असंतुष्ट असणाऱ्या, काम, कामना, इच्छारूपी कामशत्रूनें ज्ञान आच्छादिलें आहे.]

अन्वयः कौन्तेय! ज्ञानिनः नित्यवैरिणा एतेन कामरूपेण दुष्पूरेण अनलेनच ज्ञानम् आवृतम्।

अर्थ : हे कौंतेया! उपभोगानें शांत न होणाऱ्या व तेथील वासनाही नेहमीं वाढत राहणाऱ्या आवर्त (वेष्टन, झांकण, वळसा) रूपी (अग्नीनें) कामानें हें ज्ञानाचें वैरपणच साधण्याचें हें एकच काम साधलेलें; व तेंच वैर असें असल्यामुळें तें असें तऱ्हाचें असतें (३९).

**तैसें ज्ञान तरी (विशुत्ध) विशुद्ध। परि इहीं असे (प्ररुत्ध) प्ररुद्ध।**
**म्हणोनि तें अगाध। होउनी ठेलें ॥ २६३ ॥**

**आधीं यांतें जिणावें। मग तें ज्ञान पावावें।**
**तंव पराभव न संभवे। रागद्वेषां ॥ २६४ ॥**

**यांतें साधावयालागीं। जैं बळ जाणिजे आंगीं।**
**तें इंधनें जैसीं आगी। मावावो होय ॥ २६५ ॥**

विशुद्ध–शुद्ध. इहीं = ह्या कामरूपानें (कामक्रोधांनीं). प्ररुद्ध = रोधलेले, विरोधिलेले, आच्छादिलेले. होउनी–होऊनि. ठेलें = राहिलें आहे, झालें आहे. अगाध = दुर्लभ, कठिणतर, शोधण्यास खोल (२६३). पराभव–पराभवा. रागद्वेषां–रागद्वेषांचा (२६४). साधावयालागीं = जिंकण्यासाठीं. जै–जें. मावावो–सावावो = उत्तेजक, साह्यकारी (२६५).

ज्ञान हें मूळचें पवित्र, पण या कामक्रोधांनीं अडविलेलें म्हणून तें बुद्धीला कळण्यास कठीण होऊन राहिलें आहे. (२६३).

आधीं या कामक्रोधांना जिंकावें व मगच तें ज्ञान पावावें, तें जिंकणें होईपर्यंत रागद्वेषांचा पराभव संभवतच नाहीं. (२६४)

यांना जिंकण्यासाठीं जें कांहीं बळ अंगीं आणावें लागतें तें कसें तर जसें का इंधनेंच मुळीं अग्नीस उत्तेजक अशीं–साह्यकर्त्री अशीं जाण. जें कांहीं बळ पाहावें तेंच कीं मुळीं ह्यांनाच साध्य होणारें होतें. (२६५)

**इन्द्रियाणि मनो बुद्धिरस्याधिष्ठानमुच्यते।**
**एतैर्विमोहयत्येष ज्ञानमावृत्य देहिनम् ॥ ४० ॥**

[अस्य = याचें. अधिष्ठान = आश्रयस्थान. उच्यते = असें सांगतात–म्हणतात. एष = हा. एतैः = ह्यांच्या. विमोहयति = भुरळ पाडतो. देहिनम् = देहाभिमानी आत्म्याला.]

अन्वयः अस्य अधिष्ठानम् उच्यते इन्द्रियाणि मन बुद्धिः एष एतैः ज्ञानम् आवृत्य विमोहयति देहिनम्।

अर्थ : इंद्रियें, मन व बुद्धि हीं ह्या कामाचीं अधिष्ठानें (आश्रयस्थानें) आहेत, असें म्हणतात. त्या स्थानाच्या आश्रयानें हा काम सद्सद्विवेकास आच्छादून ह्या जीवाला मोहित करतो (४०).

**तैसे उपाय कीजती जे जे। तयांशीच होती विरजे।**
**म्हणोनि हटयांतें जिणिजे। इहींचि जगीं ॥ २६६ ॥**

**ऐसिया सांकडां बोला। (येक) एक उपाय आहे भला।**
**तो करितां जरी आंगवला। तें सांगेन तुज ॥ २६७ ॥**

तयांशीच = कामरूपासच. विरजे = साध्य. हटयांतें–हटियांतें = हटवादींना ह्या. इहींचि = हट–योग्यता ही ह्या कामक्रोधांना जिंकतात (२६६). ऐसिया–ऐसियांही. सांकडां = संकटाच्या. आंगवला = मानवला. तें सांगेन–तें तरी सांगेन (२६७).

त्याप्रमाणें जेथें उपाय करावेत-व्हावेत ते ते उपाय तर ह्या कामक्रोधांनाच की मित्रतेचे असे साह्यकर्ते होतात; आणि म्हणूनच की ह्या इंद्रियांनाच ह्या जगीं अगोदर जिणावें असें आहे. (२६६)

अशा ह्या संकटांतून सुटण्याला असें हें बोलणेंच मुळीं अरिष्ट दाखविणारें, का संकटच एक घावरून सोडणारें; पण येथें नच घावरून आतां एक उपाय तो भलेपणाचा करावा-तो मानवला, साध्य झाला तर (पाहा)-सांगतों ऐक. (२६७)

**तस्मात्त्वमिन्द्रियाण्यादौ नियम्य भरतर्षभ ।**
**पाप्मानं प्रजहि ह्येनं ज्ञानविज्ञाननाशनम् ॥ ४१ ॥**

[त्वम् = तूं. आदौ = प्रथम. नियम्य = संयमन करून. ज्ञानविज्ञान = शास्त्रज्ञान व आत्मानुभवज्ञान. प्रजहि = नाहींसा कर.]

**अन्वय :** भरतर्षभ! तस्मात् त्वम् आदौ इन्द्रियाणि नियम्य ज्ञानविज्ञाननाशनम् हि एनं पाप्मानं प्रजहि।

**अर्थ :** म्हणून हे भरतकुलोत्पन्ना अर्जुना! तूं प्रथम इंद्रियांचें नियमन कर व ह्या ज्ञानाचा व विज्ञानाचा (अध्यात्मिक ज्ञानाचा व अधिभौतिक ज्ञानाचा म्हणजे व्यावहारिक ज्ञानाचा) नाश करणाऱ्या ह्या पापी कामाला नाहींसा कर (४१).

**तरि ययांचा पहिला कुरठा इंद्रियें । येथूनि प्रवृत्ति कर्मातें विये ।**
**आधीं निर्दळूनि घाली तिये । सर्वथैव ॥ २६८ ॥**

तरि ययांचा-इयाचा. कुरठा = घरटें, आधार, आश्रय. विये = उत्पन्न करते, प्रसवते. निर्दळुनि-निर्दळूं = जिंकूं. घाली = टाक (२६८).

ह्याचें पहिलें मुख्य आश्रयस्थान म्हणजे इंद्रियें हीं होत. ह्या इंद्रियांपासून कर्माकडे प्रवृत्ति-वर्तन-होते. प्रवृत्ति कर्मास वीते-जन्म देते-म्हणून आधीं या इंद्रियांची प्रवृत्ति-विषयप्रवृत्ति-सर्वथैव नाहींशी करून असावें. (२६८)

**इन्द्रियाणि पराण्याहुरिन्द्रियेभ्यः परं मनः ।**
**मनसस्तु परा बुद्धिर्यो बुद्धेः परतस्तु सः ॥ ४२ ॥**

[पर = श्रेष्ठ. इंद्रियें = पांच "ज्ञान" व पांच "कर्म" अशीं दहाही इंद्रियें. पराणि आहुः = श्रेष्ठ असें श्रुति म्हणतात. परतः तु सः = तोच सर्वसाक्षी आत्मा होय. (तो बुद्धिच्याही पलीकडे-बुद्धिपेक्षा श्रेष्ठ आहे.)]

**अन्वय :** सः बुद्धे परतः मनसः परा बुद्धिः मनः इंद्रियेभ्यः परम् पराणि इंद्रियाणि आहुः।

[इंद्रियाणि पराणि आहुः ( = सर्व इंद्रियें-५ ज्ञानेंद्रियें व ५ कर्मेंद्रियें = १०-श्रेष्ठ आहेत असें श्रुति म्हणतात.) इंद्रियेभ्यः परं मनः आहुः ( = त्या इंद्रियांपेक्षां मन श्रेष्ठ आहे.) मनसस्तु परा बुद्धिः आहुः ( = मनापेक्षां बुद्धि श्रेष्ठ आहे, परंतु). बुद्धे परतः आहुः सः सः पुरुषः (सकारः। हकारः॥ प्रकृति-पुरुषः॥) ( = जो बुद्धिच्याहि पलीकडे आहे-श्रेष्ठ आहे-तोच प्रसिद्ध सर्वसाक्षी आत्मा जो त्याचा आश्रय कर.)]

**अर्थ :** विषयापेक्षां इंद्रियें श्रेष्ठ, इंद्रियांपेक्षां मन श्रेष्ठ, मनापेक्षां बुद्धि श्रेष्ठ व बुद्धिपेक्षांहि जो श्रेष्ठ तो आत्मा होय, असें श्रुतींनीं म्हटलें आहे (४२).

**मग मनाची धांव पारुषैल । आणि बुद्धीची सोडवण होईल ।**
**इतुकेनि थारा मोडेल । या पापियांचा ॥ २६९ ॥**

मनाची धांव = मनाची गति. सोडवण = सुटका. थारा = आश्रय (२६९).

तरच मग त्या मनाची धाव थांबेल, बुद्धिही त्यांतून सुटेल; बुद्धीची सोडवणूक होईल व एवढ्यानेंच त्या दुष्टाचें आधारस्थान मोडेल. (तागा–मोडेल–आधार–स्थान, घरटें, मोडेल.) (२६९)

**एवं बुद्धेः परं बुद्ध्वा संस्तभ्यात्मानमात्मना ।**
**जहि शत्रुं महाबाहो कामरूपं दुरासदम् ॥ ४३ ॥**

[ एवं = याप्रमाणें. बुद्धेः परं = बुद्धीच्या पलीकडे. ]

**अन्वय :** महाबाहो ! बुद्धेः परं एवं बुद्ध्वा आत्मानम् आत्मना संस्तभ्य कामरूपं दुरासदं शत्रुं जहि ।

**अर्थ :** अर्जुना ! याप्रमाणें बुद्धिहून श्रेष्ठ, स्वतंत्र आणि स्वयंप्रकाश अशा आत्म्याला ओळखून, त्या रूपगुणानें युक्त असें जें आत्मज्ञान त्यानें बुद्धि स्थिर करून, त्या दुर्दमनीय कामरूपी शत्रूला जहि म्हणजे जिंक; अंतःकरणांत त्याला थारा देऊं नको (४३).

**हे अंतरींहुनि जरी फिटले । तरि निभ्रांत जाण निवटले ।**
**जैसें रश्मीविण उरलें । मृगजळ नाहीं ॥ २७० ॥**

**जैसे रागद्वेष जरि निमाले । तरी ब्रह्मींचें स्वराज्य आलें ।**
**मग तो भोगी सुख आपुलें । आपणचि ॥ २७१ ॥**

**जे गुरुशिष्याची गोष्टी । पिंडापदाची गांठी ।**
**तेथें (स्छिर) स्थिर राहोनि नुठी । कवणे काळीं ॥ २७२ ॥**

**ऐसें सकळसिद्धांचा रावो । देवी लक्ष्मीयेचा नाहो ।**
**राया ऐकें देवाधिदेवो । बोलता जाला ॥ २७३ ॥**

**आतां पुनरपि तो अनंत । आद्य एकी मात ।**
**सांगेल तेथ पंडुसुत । प्रश्न करील ॥ २७४ ॥**

**तया बोलाचा हन पाडु । कीं रसवृत्तीचा निवाडु ।**
**येणें श्रोतयां होईल सुरवाडु । श्रवणसुखाचा ॥ २७५ ॥**

**ज्ञानदेव म्हणे निवृत्तीचा । चांग उठावा धरूनि उन्मेषाचा ।**
**मग संवाद श्रीहरिपार्थाचा । भोगा बापा ॥ २७६ ॥**

फिटले = पुरते झाले. निवटले = मेले, विभागले, घेरले (२७०). जैसे–तैसे. निमाले = नाश पावले (२७१). पिंडापदाची गांठी = जीव-ब्रह्माचें ऐक्य–गुरुशिष्याची गोडी (२७२). देवाधिदेवो–देवदेवो (२७३). अनंत = भगवान् श्रीकृष्ण. आद्य एकी मात = पुरातन एक गोष्ट (२७४). पाडु–पाड = योग्यता, महत्त्व. रसवृत्ति = रसिक भाषणाचा, रसभरितपणाचा. हन = समुच्चयार्थक अव्यय. निवाडु–निवाड (२७५). उन्मेषाचा = ज्ञानाचा, ज्ञानस्फूर्तीचा. चांग = चांगला. भोगा–भोगावा (२७६).

हे (कामक्रोध) अंतरामधून जरी फिटले (गेले) तरी निःसंशय जाण मेले, निवटले जसें रश्मीवीण मृगजळ उरलें नाहीं–रश्मी (सूर्यकिरण) नाहींत तर मृगजळ नाहीं. (२७०)

तसें ते रागद्वेष, कामक्रोध जरी का निमाले तरी मग ब्रह्मींचें कीं पूर्ण स्वातंत्र्य मिळालें–आलें समजावें; व मग तो आपलें सुख आपणच कीं भोगतो–भोगूं लागतो, उपभोगतो— (२७१)

ती ज्ञानदा, ते अनुभविक सद्गुरु आणि सच्छिष्य यांतला उपदेश-गोष्टी, जें आत्मपद, शिवपद व जीवभाव यांचें ऐक्य-तेथेंच स्थिर राहून असा त्या आत्मानंदांतच रममाण होऊन, तेथेंच समरस होऊन असा तेथून मुळींच बाजूंस होऊं नको ! (२७२)

सकळ सिद्धांताचा राजा-राव, देवी लक्ष्मीचा नाहो-नाथ, पति-हे राया, ऐक कीं असें तो बोलिला-वदला (बोलून गेला, ऐसे बोल बोलता झाला)- (२७३)

आतां पुनरपि पुन्हां पुढती तो अनंत-देव पुरातन अशी एक गोष्ट सांगणार आहे-सांगेल, तेथें अर्जुन-पंडूचा सुत-प्रश्न करील. (२७४)

त्या बोलणें केल्याचा पाड-महत्त्व तेथें रसवृत्तींचा निवाडा होणार आहे; श्रोत्यांना त्यापासून श्रवणसुखानुभवाचा-रसभरित भाषणाचा सुकाळ होईल. (२७५)

श्रीनिवृत्तिचे दास, श्रीज्ञानदेव म्हणतात कीं-ज्ञानाचा चांगला उत्साह धरून मग प्रश्नोत्तरी बोली-श्रीहरि-पार्थांचा संवाद तो ऐका, त्याचा अनुभव घ्या, भोगा, उपभोगा, अनुभवाचा करा. (२७६)

इति श्रीमत् भगवद्गीतासूपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे
श्रीकृष्णार्जुनसंवादे कर्मयोगो नाम तृतीयोऽध्यायः ॥

[श्लोक ४३. ओंव्या २७६. एवम् ३१९. श्रीकृष्णार्पणमस्तु ।]

॥ ॐ तत्सत् कृष्णार्पणमस्तु ॥